# मर्चंट ऑफ व्हेनिस

## मराठी शेक्सपिअर

३

वोरा अॅण्ड कंपनी पब्लिशर्स प्रायव्हेट लि.
३, राउंड बिल्डिंग, काळबादेवी, मुंबई २

मूल्य : रु. १-२५ न. पैसे

# ३. मर्चंट ऑफ व्हेनिस

[व्हेनिसचा व्यापारी]



अनुवादक : दा. न. शिखरे

चित्रकार : सुधाकर खासगीवाले

पहिली आवृत्ति

१९५८ जून



मूल्य : रु. १-२५ न. पैसे







प्रकाशक :
एस्. के. वोरा,
वोरा ॲण्ड कंपनी
पब्लिशर्स प्रा. लि.,
३ राउंड बिल्डिंग,
काळबादेवी, मुंबई २




मुद्रक :
ज. ग. जोशी,
जनार्दन प्रेस, ३९४ सदाशिव,



ही एक खुमासदार प्रणय-कथा आहे. नायक-नायिकांच्या प्रणयाचे आणि त्यासाठी त्यांनी सोसलेल्या संकटांचे नि योजलेल्या चातुर्यांचे रम्य चित्रण तर त्यांत आहेच; पण त्याशिवाय उपपात्रांचेहि चांदण्या रात्रींत प्रेमालाप व पलायनादि प्रेम-पराक्रमहि त्यांत वर्णिलेले आहेत

या प्रणयाच्या एका कोंदणांत या नाटककाराने मानवी स्वभावाचे किती सुंदर सुंदर हिरे बसविले आहेत. दोन मित्रांचे प्रेम किती उदात्त असू शकते आणि त्यासाठी आत्मबलिदानापर्यंतचा त्याग कसा केला जातो, याचें हृदयंगम चित्र या नाटकांत जसें पहावयास मिळतें, तसें अन्यत्र क्वचितच पहावयास मिळेल. अशा उजळ गुणांनीं मानवी स्वभाव जसा लखलखत असतो, तसाच काळ्याकुट्ट दुर्गुणांनींहि काळवंडलेला असतो, हे नाटककाराने दाखविले आहे. शॉयलॉक हा तर स्वार्थ, लोभ, क्रौर्य इत्यादि दुर्गुणांचा पुतळा म्हणूनच सर्व जगाला माहीत आहे हाडामासाचा खराखुरा हा सावकार इतिहासांत होऊन गेला असावा, असा सर्वांचा समज होण्याइतके खलनायकाचें हे पात्र उत्कृष्ट रंगविलेले आहे त्यात शेक्सपियरची थोरवी ही की, तो शॉयलॉकइतका दुष्ट व क्रूर कां बनला याचीं कारणेंहि त्याने दिलीं आहेत सतत हसत ठेवणारे, एकसारखी उत्कंठा वाढविणारे आणि नाना रस निर्माण करणारे हे आनंदपर्यवसायी नाटक मानवी मनाचें व जगताचें यथार्थ दर्शन घडविणारे आहे.

— दा. न. शिखरे

# ३. मर्चंट ऑफ व्हेनिस

[ व्हेनिसचा व्यापारी ]



अनुवादक : दा. न. शिखरे

चित्रकार : सुधाकर खासगीवाले

पहिली आवृत्ति

१९५८ जून



मूल्य : रु. १-२५ न. पैसे







प्रकाशक :

एस्. के. वोरा,
वोरा अ‍ॅण्ड कंपनी
पब्लिशर्स प्रा. लि.,
३ राउंड बिल्डिंग,
काळबादेवी, मुंबई २



मुद्रक :

ज. ग. जोशी,
जनार्दन प्रेस, २९४ सदाशिव,
पुणे २



ही एक खुमासदार प्रणय-कथा आहे. नायक-नायिकांच्या प्रणयाचे आणि त्यासाठीं त्यांनीं सोसलेल्या संकटांचे नि योजलेल्या चातुर्याचे रम्य चित्रण तर त्यात आहेच; पण त्याशिवाय उपपात्रांचेहि चांदण्या रात्रींत प्रेमालाप व पलायनादि प्रेम-पराक्रमहि त्यात वर्णिलेले आहेत

या प्रणयाच्या एका कोंदणात या नाटककारानें मानवी स्वभावाचे किती सुंदर सुंदर हिरे बसविले आहेत  दोन मित्रांचे प्रेम किती उदात्त असूं शकते आणि त्यासाठीं आत्मबलिदानापर्यंतचा त्याग कसा केला जातो, याचें हृदयंगम चित्र या नाटकात जसे पहावयास मिळते, तसे अन्यत्र क्वचितच पहावयास मिळेल. अशा उजळ गुणांनीं मानवी स्वभाव जसा लख-लखत असतो, तसाच काळ्याकुट्ट दुर्गुणानीहि काळवंडलेला असतो, हे नाटककाराने दाखविले आहे. शॉयलॉक हा तर स्वार्थ, लोभ, क्रौर्य इत्यादि दुर्गुणाचा पुतळा म्हणूनच सर्व जगाला माहीत आहे. हाडामांसाचा खरा-खुरा हा सावकार इतिहासात होऊन गेला असावा, असा सर्वांचा समज होण्याइतके खलनायकाचे हे पात्र उत्कृष्ट रंगविलेले आहे. त्यात शेक्स-पियरची थोरवी ही कीं, तो शॉयलॉकइतका दुष्ट व क्रूर कां बनला याचीं कारणेंहि त्याने दिलीं आहेत. सतत हसत ठेवणारे, एकसारखी उत्कंठा वाढ-विणारें आणि नाना रस निर्माण करणारें हे आनंदपर्यवसायी नाटक मानवी मनाचे व जगताचें यथार्थ दर्शन घडविणारे आहे.

— दा. न. शिखरे



# मर्चंट ऑफ व्हेनिस

[ व्हेनिसचा व्यापारी ]







## ★ कर्जाची कट्यार : १

दोन मित्र; अगदी जिवश्चकंठश्च. त्यापैकी ॲन्टोनिओ हा श्रीमंत, पण बॅसानिओ हा गरीब. तथापि दोघांचे एकमेकांवर प्रेम अतिशय. बॅसानिओ गरीब असला तरी छानछुकीने रहात असे. आपल्या ऐपतीबाहेर ऐश्वर्य तो दाखवीत असे. त्यामुळे त्याची जिंदगी ढासळत चालली होती, एवढेच नव्हे तर, त्याच्या डोक्यावरील कर्जाचा बोजा वाढत चालला होता. त्याला पैशाची लागेल तेव्हा व लागेल तितकी मदत ॲन्टोनिओ मुक्त हस्ताने करी. तसा तो मनाचा मोठा प्रेमळ होता व हाताचा सढळ होता.

हे दोघे जिवाभावाचे मित्र व्हेनिस शहरात रहात. व्हेनिस हें इटालीतील अत्यंत सुंदर व संपन्न शहर. त्या शहरातून कितीतरी कालवे वहात. त्या कालव्यावरून जाण्यायेण्याकरिता कितीतरी पूल बांधलेले होते, त्यामुळे त्या शहराला विलक्षण शोभा आली होती. १४ व्या शतकांतील ही गोष्ट आहे.

त्यावेळी व्हेनिस शहरात व्यापार भरभराटलेला होता. त्यातहि ॲन्टोनिओचा व्यापार दूरदूर देशाशी चाले. तेथून रेशमी वस्त्रे, मसाल्याचे पदार्थ वगैरे जिन्नस आणून त्याचा व्यापार तो करी व त्यावर त्याला खूप कमाईहि होई.

एके दिवशी अन्टोनिओ रस्त्यावरून आपल्या मित्राशी बोलत चालला होता. का कोण जाणें, पण आज त्याचें मन उदास होते. त्याची जहाजे समुद्रावर हेलकावे खात होती, म्हणून त्याचें मन हेलकावे खात असेल, असा तर्क त्याच्या एका मित्रानें बांधला. तर दुसरा दोस्त त्याची चेष्टा करूं लागला, "प्रेमात बिमात तर पडला नाहीस ना?"

इतक्यात बॅसानिओ तेथे आला. तेव्हा त्या गप्पिष्ट मित्रांनी ॲन्टोनिओचा निरोप घेतला. ते जाताच ॲन्टोनिओ बॅसानिओची आस्थेने व प्रेमाने विचारपूस करूं लागला.

"अरे, आज तूं मला त्या मुलीबद्दल काही सांगणार होतास ना? 'तिची मी एकदा चोरून भेट घेतली,' असे तूं मला म्हणाला होतास. मग सांग ना आता तिच्याविषयी सारं काही. कुठं असते ती? कशी आहे ती?"

त्याचा हात हातात घेऊन व तो प्रेमाने दाबीत बॅसानिओ म्हणाला, "तुला नाही तर मी कोणाला सांगणार? तूं माझ्या जिवाभावाचा मित्र— मला अडीअडचणीत उपयोगी पडणारा. माझ्या प्रेमाच्या अन् पैशाच्या साऱ्या गोष्टी तुला माहीत. त्यात तू मला सतत मदत करीत आलेला. तेव्हा तुझ्यापासून मी लपवून काय ठेवणार? अन् कशासाठी?"

"खरं आहे ते. म्हणून तर म्हणतो, सांग, सांग बघूं सारं मला." ॲन्टोनिओ मोठ्या उत्सुकतेने म्हणाला.

बॅसानिओलाहि मोठा आनंद वाटला. इतक्या आस्थेनें आपली विचारपूस करणारा व इतक्या प्रेमानें आपल्याला मदत करणारा मित्र मिळणे हे केवढें भाग्याचें! असे वाटून त्याने आपले मन मित्रापाशी पूर्ण मोकळे केले.

"बेलमॉट या शहरी ती सुंदर तरुणी रहाते. फारच सुंदर आहे ती. किती सुंदर आहे म्हणून सांगूं ॲन्टोनिओ? 'सुंदर' या शब्दापेक्षाहि ती अधिक सुंदर आहेरे! शब्दानी वर्णन करण्यापलिकडे ती सुंदर आहे."

"वा! छान!! सौंदर्याशिवाय आणखी कोणते गुण आहेत तिच्यामधे?"

"आणखीन्? आणखीन् गुण पुष्कळच आहेत— असंख्य आहेत. अरे,

ती किती श्रीमंत आहे! तिच्या वडिलांनीं तिला गडगंज संपत्ती ठेवलेली आहे ना!"

"ठीक! ठीक!! सौंदर्य नि संपत्ति यांचा हा संगम सुरेख आहे. पण तिच्या स्वभावांतले गुण?"

"ते तर अगदी अलौकिक आहेत. तिचे एकेक गुण पाहून मी तर आश्चर्यानं अगदी थक्क होऊन जातो. नाकाची चाफेकळी आणि तिचे ते टपोरे डोळे! तेच मला प्रेमाचे मूक संदेश नेहमीं पाठवीत असतात."

"असं? चांगलाच भाग्यवान आहेस की तूं. पण तिचं नाव तरी समजूं दे."

"अहाहा! तिचं नाव किती गोड! पोर्शिया! तिचं नांव पोर्शिया! तिचं सौंदर्य, तिचे सद्गुण, तिची संपत्ति अलम् दुनियेला माहीत आहे. तिच्यावर लुब्ध कोण होणार नाही? चारी दिशाकडून नाना देशांतून मोठ-मोठे श्रीमंत लोक तिला मागणी घालण्यासाठी तिच्या दाराशी उभे असतात. तिच्या गालावर रुळणारे सोनेरी केस टक लावून पहात असतात. खरोखर, माझेजवळ पैसा असता, तर मी तत्काळ तिथे जाऊन त्या श्रीमंत तरुणाच्या मालिकेतच उभा राहिलों असतों—पोर्शियाच्या कृपाकटाक्षाची वाट पहात राहिलों असतो. पैसा! पैसा!! यावेळी मला फक्त पैसा हवा आहे."

बॅसानिओची ती प्रेमाची उत्कटता व व्याकुळता ॲन्टोनिओचे ध्यानी आली— आणि त्याला खेद वाटला. कारण यावेळी त्याचेजवळ शेकडा पैसा असा नव्हता. तो मूळचा श्रीमंत, त्याचा व्यापार तेजीत चाललेला, त्यातून त्याला चांगली बरकत होणार, हें सारे खरें; पण आज प्रत्यक्ष पैसा त्याचे हातात नव्हता आणि थैलीतहि नव्हता. तेव्हा तो बॅसानिओकडे पाहून कळवळून म्हणाला,

"काय करूं रे मित्रा! माझ्या मनांत असून तुला मी आज कांही मदत करूं शकत नाहीं. माझीं गलबतं समुद्रावर फिरत आहेत. तीं परत आलीं की पैसाच पैसा! अन् तो सारा तुझ्यासाठी!!"

"खरं आहे, हे तुझं म्हणणं अगदी खरं आहे. पण ॲन्टोनिओ, मला कर्जांतून वर काढायला आणि माझं प्रेम सफळ करायला तुझ्याशिवाय दुसरा कोण हात देईल?"

बॅसानिओची ही काकुळतीची विनंति ऐकून अॅन्टोनिओचें आंतडे तुटूं लागलें. कांहीहि करून आपण आपल्या मित्राला साहाय्य केलेंच पाहिजे असा निर्धार त्याच्या मनानें केला आणि तो भावनेच्या आवेगात एकदम म्हणाला,

" माझा पैसा, माझी पत, माझं सर्वस्व तुझ्यासाठी मोकळं आहे. तुझी गरज भागविण्यासाठी तू त्याचा हवा तसा उपयोग करून घे. त्यात मला आनंद आहे. मी काय करूं तें तूं सांग, की मी तें केलंच म्हणून समज. "

अॅन्टोनिओची ती उदार वृत्ति पाहून बॅसानिओचें हृदय गहिवरलें. पण मित्राच्या त्या मदतीचा उपयोग कसा करून घ्यावा हे त्याला कळेना. त्याला हवा होता रोकड पैसा; आणि नेमका तेवढाच अॅन्टोनिओजवळ नव्हता. या पेचप्रसंगातून मार्ग कसा काढावयाचा याची युक्ति काही त्याला सुचेना. अगतिक मुद्रेनें व खिन्न नजरेनें तो त्याचेकडे पाहूं लागला.

" मला तर यातून काहीच मार्ग दिसत नाही. तूच काही तोड काढ, " तो पुटपुटला.

अॅन्टोनिओहि विचारात पडला. आपल्या जिवलग मित्राचे सारे आयुष्य सुखाचे होणार की नाही, याचा निर्णय करणारा तो आणिबाणीचा क्षण होता. विचार करता करता अॅन्टोनिओला एक शक्कल सुचली. क्षणमात्र त्याचे मन चरकलें. कारण ती शक्कल तडीस नेताना त्याला मोठा अपमान गिळावा लागणार होता. त्याच्यासारख्या मातबर व्यापाऱ्याने दुसऱ्याकडे याचनेसाठी हात पसरणे हे किती कमीपणाचें ! पण मित्रासाठी तेंहि करण्याचे त्याने ठरविलें. म्हणून तो बॅसानिओला म्हणाला,

" मित्रा, तुला माहीतच आहे. माझी सारी संपत्ति समुद्राच्या लाटावर झोके खात आहे. आत्ता, या क्षणी रोकड पैसा मजजवळ नाही; अन् तसा पैसा उभा करण्यासाठी माझ्याजवळ काही मालहि नाही. पण गड्या, अशाहि स्थितीत मला एक मार्ग सुचतो. "

" कोणता तो बाबा ? " बॅसानिओनें अधीरतेनें विचारलें. समुद्रात बुडणारा माणूस गवताच्या काडीचाहि आधार घेतो. तशा आशेनें व उत्सुकतेने तो आपल्या मित्राकडे पाहू लागला.

" तूं या साऱ्या शहरात हिंड. अन् माझ्या पतीवर जेवढं द्रव्य तुला उभं करता येईल, तेवढं खुशाल कर.

" –अन् ते तूं पोर्शियाच्या चरणी प्रेमानं अर्पण कर. जा, जा, लवकर जा. आणि या व्हेनिस शहरात चौकशी कर—माझ्या नावावर, माझ्या पतीवर, कोण किती द्रव्य देतो ते. पैशासाठी प्रेमाचा मार्ग अडता कामा नये. "

व्हेनिस शहर म्हणजे श्रीमंत व्यापाऱ्यांचं आगर. पण मागताक्षणी खडी रक्कम उभी करणारे 'व्यापारी किती असणार ? होय, तरीपण एक होता. एक तसा हरीचा—नव्हे लक्ष्मीचा लाल होता. तो होता ज्यू म्हातारा. मोठा चिक्कू होता. पैशासाठी प्राण टाकणारा होता – अन् प्राण घेणाराहि होता. तो मागणाराला हवे तितके कर्ज देई व आपल्याला हवे तितकें व्याज चोपून घेई. " निर्दय सावकार " असा त्याचा लौकिकच होता ! दयामाया त्याला माहीत नव्हती. पैसा हाच त्याचा परमेश्वर आणि सावकारी हीच त्या परमेश्वराची पूजा. जास्तींत जास्त व्याज लुबाडणे म्हणजे पुण्य जोडणे ही त्याची भावना. त्यातहि तो ज्यू. ख्रिश्चन लोकांचा कट्टा द्वेष्टा. म्हणून अगदीं अगतिक झाल्याशिवाय त्याचेकडे कोणी जात नसे. त्याचें नाव होतें शॉयलॉक. पण आज त्याच्यापुढेच हात पसरण्याची पाळी बॅसानिओवर आली.

कोणी काही, कोणी काही अशा सर्वांनी सांगून बॅसानिओला वाटाण्याच्या अक्षता लावल्या. आणि त्याला तर पोर्शियाकडे पोहोचण्याची घाई होती. म्हणून मन घट्ट करून व नाक मुठीत धरून तो शॉयलॉककडे गेला. ऋणकोच्या आर्जवी स्वरात तो त्याला म्हणाला, " मला पैशाची गरज आहे. तुम्ही कर्ज द्याल का ? "

" कर्ज ? अन् किती ? " शॉयलॉक गुरगुरला.

" ३००० डुकॅट, " बॅसानिओ पुटपुटला.

" ३००० काय ? ठीक " शॉयलॉकने मान हालविली

" आणि फक्त तीन महिन्यासाठी, महाराज. " आपली मागणी त्याला सहज पुरी करता येण्यासारखी आहे असे दाखविण्यासाठी बॅसानिओ म्हणाला.

" तीन महिन्यासाठी काय ? ठीक. " पुन्हा मान हालवीत व ओठ दातानीं चावीत शॉयलॉक उद्गारला.

ख्रिश्चनावर सूड उगविण्यास ही नामी संधि आहे हे त्याच्या बुद्धीने अचूक हेरले. त्याने आपल्या मनाशी काही निर्धार केला. दूरवरचा–फार दूरवरचा शेवट त्याच्या कल्पनाचक्षुंना दिसू लागला. आणि त्यामुळे त्याच्या अंतःकरणातील क्रूर वासना आनंदाने नाचू लागल्या. आपल्या मनाशी काही एक व्यूह रचीत त्यानें विचारले, "याला जामीन ?"



"याला जामीन माझा मित्र ॲन्टोनिओ." अभिमानानें छाती फुगवून बॅसानिओने उत्तर दिले.

"ॲन्टोनिओ ? तो बडा व्यापारी ?" शॉयलॉकने विकट हास्य केलं. त्याचा निर्धार द्विगुणित झाला. त्याचा क्रूर आनंद दुप्पट उत्साहाने उसळू लागला. डोळे किलकिले करून तो दूरवर पाहू लागला. तो काहीच बोलत नाही असे पाहून बॅसानिओचे चित्त व्याकुळ होऊ लागलं. कारण त्याच्या उत्तरावर बॅसानिओच्या जीवनाचं सारं सौख्य अवलंबून होतं. म्हणून त्यानें

अत्यंत आर्जवी स्वरात विचारले, "मग पैसे देणार ना ? आपण मजवर कृपा करणार ना ? आपले उत्तर मला लवकर कळेल का ?"

शॉयलॉकने गंभीर स्वरात मुद्द्याचे शब्द तेवढे उच्चारले.

"तीन हजार डुकॅट, तीन महिने मुदत आणि त्याला जामीन ॲन्टोनिओ !"

"आपला निर्णय ?" बॅसानिओची उत्कंठा आता पराकोटीला पोहोंचली. सर्वांगाचे कान करून तो उत्तर ऐकूं लागला.

पण शॉयलॉकच्या मुखातून शब्द निघाले, ते एवढेच – "ॲन्टोनिओ हा एक सज्जन माणूस आहे."

त्याचें तें बोलणे उपरोधिक आहे, असे वाटून बॅसानिओने विचारलें, "कां ? तुम्हीं कांहीं त्याचे विरुद्ध ऐकले आहे का ?"

"छे: छे: छे: ! मुळींच नाहीं. माझ्या म्हणण्याचा अर्थ इतकाच कीं, जामीन राहाण्यास तो चांगला असामी आहे. मात्र त्याचे उद्योगधंदे धोक्यात आहेत. त्याचं एक गलबत त्रिपोलीकडे आहे, तर दुसरं इंडीजकडे आहे. आणि परवा मी आपल्या 'महाजन मंडळात' गेलों होतों, तेव्हा तर मला कळलं कीं, त्याचं आणखी एक गलबत मेक्सिकोला आणि आणखी एक इंग्लंडला गेलं आहे. आपला पैसा दगादिगा पेरून ठेवण्याचं धाडस त्यानं केलं आहे. त्यातून पुढं काय उगवेल हे आज कोणीं कसं सांगावं ?" असे म्हणून शॉयलॉक बॅसानिओच्या मुद्रेकडे न्याहाळून पाहूं लागला. तो ॲन्टोनिओची स्तुति करीत आहे असा त्याच्या मोठ्या आवाजावरून व हातवाऱ्यावरून बॅसानिओचा समज झाला. पण तो त्याचा भ्रम होता. तो दूर करणारे उद्गार शॉयलॉकनें लगेच काढले. तो गंभीर आवाजात म्हणाला,

"अहो, पण गलबतं म्हणजे काय ? नुसत्या लाकडाच्या फळया. आणि गलबतावरील खलाशी म्हणजे केवळ मार्थी माणसं. तीं समुद्राच्या अन् तुफानाच्या अन् डोंगराच्या क्रोधाला नि विरोधाला तोंड कशी देणार ? शिवाय जमीन-चोर आहेत, पाण-चोर आहेत, नानातऱ्हेचे चाचे, चोर, लुटारू, दरवडेखोर आहेतच कीं. आणि शेतातील त्या उंदीर-घुशी अन् पाण्यातील त्या सुसरी-मगरी ? अहो, एक का दोन ! छप्पन संकटं असतात, आपले पैसे आपल्या हातात परत येण्याला."

शॉयलॉकने रेखाटलेले संकटाचें ते विराट स्वरूप पाहून बॅसानिओ बावरला. शॉयलॉकनें उभ्या केलेल्या या साऱ्या अडचणींचा व अडथळयाचा गोळाबेरीज अर्थ तो एकच समजला—तो आपल्याला कर्ज देणार नाहीं. पण नाही. शॉयलॉक त्याला तसा मोकळाहि सोडणार नव्हता. आपल्या पज्यात सापडलेल्या उंदराशीं माजर जसे खेळते, त्याप्रमाणे तो त्या गरजवंत तरुणाशी खेळत होता. एकदम औदार्याचा आव आणून तो म्हणाला,

"पण बॅसानिओ, असं जरी असल, तरी अॅन्टोनिओचा जामीन पुरेसा आहे. ३००० डुकॅटसाठी त्याचा करारनामा मला पुरेसा आहे."

"त्याचा शब्द पुरेसा आहे अशी तुम्ही खात्री बाळगा." आशेने उल्हसित झालेल्या स्वरात बॅसानिओ ठामपणे म्हणाला.

तशी आपल्याला खात्री वाटत असल्याचे दर्शविण्यासाठी त्या म्हाताऱ्या सावकाराने मान हालविली आणि हलक्या स्वरात विचारले,

"मी अॅन्टोनिओशी बोलू काय ?"

बॅसानिओ खूष झाला. त्याने चटकन होकार भरला. एवढेच नव्हे तर, आपल्याकडे त्याने त्याला जेवावयास बोलाविले. तेथे त्याचें अॅन्टोनिओशी मनमोकळे बोलणे व्हावें, हा त्याचा हेतु.

पण शॉयलॉक पडला ज्यू. त्याला खिश्चनाचें जेवण कसे आवडणार ? त्या जेवणाची हेटाळणी करीत तो म्हणाला, "मी तुम्हा लोकाशी खरेदीविक्रीचा व्यवहार करीन, संभाषण करीन, तुमच्याबरोबर चालेन-हिंडेन, पण तुमच्या-बरोबर जेवण ? नकोरे बुवा ! तुमच्याबरोबर खाणं, पिणं, प्रार्थना करण—काही काही नको. पण हें इकडे कोण येत आहे ? महाजन मडळाकडील काय खबरबात आहे ?"

याच वेळी अॅन्टोनिओ तेथे आला. आपला मित्र बॅसानिओ शॉयलॉककडे गेल्याचे कळताच तोहि त्याला भेटण्यासाठी तेथे गेला. त्याच्यासारख्या मोठ्या प्रतिष्ठित व्यापाऱ्याने त्या कंजूष व कठोर सावकाराकडे जाणे हे खरोखर लाजिरवाणे होतें. पण मित्रप्रेमासाठी तोहि कडू प्याला पिण्याचे अॅन्टोनिओने ठरविले. मनुष्य दुसऱ्यासाठी धनाचा त्याग करू शकतो, पण मनाचा त्याग करणे फार कठीण. त्याहि त्यागास अॅन्टोनिओ केवळ मैत्रीखातर तयार झाला आणि आपण होऊन शॉयलॉककडे चालत गेला.

त्याची ओळख शायलॉकला बॅसानिओनें करून दिली. शायलॉकला अँटो-निओची मुद्रा रागीट वाटली. सक्तीनें वसूल करणाऱ्या सरकारी अधिकाऱ्या-सारखा त्याचा चेहरा उग्र आहे असें त्याला वाटलें.

आधीच शायलॉकचा अँटोनिओवर कोप. त्या काळीं ख्रिश्चन व ज्यू हे एकमेकांना पाण्यांत पहात. प्रत्यक्ष येशू ख्रिस्ताला सुळावर चढविलें तें एका ज्यूनें ना ! आपल्या धर्मसंस्थापकाचा—ईश्वराच्या लाडक्या पुत्राचा—प्राण घेणाऱ्या ज्यूंची सारी जातच सर्व ख्रिस्ती लोकांना तुच्छ निंद्य वाटू लागली. ते त्यांना दूर ठेवू लागले, छळूं लागले. याची प्रतिक्रिया म्हणून ज्यू लोकहि ख्रिश्चनांवर जळफळूं लागले, त्यांचा द्वेष करूं लागले. आणि शायलॉक हा तर त्यांचा कट्टा द्वेष्टा.

शायलॉकला अँटोनिओचा द्वेष वाटण्यास आणखी एक कारण होतें. तें म्हणजे अँटोनिओ हा लोकांना बिनव्याजानें कर्ज देत असे. त्यामुळें व्हेनिस शहरांतील सावकारीचा दर उतरला होता. शायलॉकला तर आपल्या पोटा-वर पायच आला असें वाटलें. 'एकदा तो माझ्या तडाख्यांत सांपडूं दे तर खरा, म्हणजे दाखवितों मी त्याला चांगला इंगा,' असें तो वारंवार म्हणे.

अँटोनिओ ज्यू जातीचा तिरस्कार करतो म्हणून तर त्याचेवर शायलॉकचा गुस्सा होताच, पण त्याशिवाय आपली व्यक्तिश: निंदाहि तो करतो म्हणून शायलॉक त्याचेवर चडफडत होता. 'कोठें चार व्यापारी जमले कीं लागलाच हा माझी नालस्ती करायला. तो माझ्या व्यापाराची टर उडवितो. माझ्या काटकसरीची कुचेष्टा करतो. बरं आहे म्हणावं बच्चमजी ! यावेळीं तुला जर मी मोकळा सोडीन, तर धिक्कार असो माझ्या जातीला !' असे क्रोधाचे कढामागून कढ शायलॉकच्या चित्तात उसळत होते. पण ते सारे धूर्तपणानें मनांतल्या मनात दाबून व मुद्रेवर तिरस्काराची छटाहि न दाखविता, शायलॉक साळसूदपणाच्या स्वरानें बॅसानिओला म्हणाला,

"मी माझ्या शिलकीची मोजदाद मनांत करीत होतों. केवळ स्मरणा-वरून माझा अंदाज असा होतो कीं ३००० डुकॅटची सर्व रक्कम तुम्हाला तावडतोब देण्याइतका ऐवज माझ्याजवळ सध्या तरी नाहीं. पण त्याचं काय मोठंसं ? टुबल धनिक ज्यू सहज देईल मला रक्कम. पण थांबा हं ! किती महिन्यासाठी पाहिजे आहे तुम्हाला ही रक्कम ?"

नाटकी आविर्भावानें शॉयलॉक ॲन्टोनिओकडे वळून कृत्रिम आदरभावाने म्हणाला, " आपण निश्चित असा महाराज ! आपली गोष्टच निराळी. "

पण ॲन्टोनिओनं त्याच्या मानभावी शब्दाची किमत ओळखली. तो त्याला तुच्छ मानी. पण आज ' प्रसंग पडला बाका म्हणून गाढवाला म्हणावयाचें काका ! ' तो शॉयलॉकला मोजक्या शब्दात पण सरळपणे म्हणाला, " हे पहा शॉयलॉक, मी कधी पैसे व्याजाने देत नाही नि घेतहि नाही. परतु माझ्या या दोस्ताची निकडीची नड भागविण्यासाठी मी माझा नियम मोडतो आहे. "

मग ॲन्टोनिओने बॅसानिओला विचारले, " तुला किती रक्मेची गरज आहे, हे त्याला सागितलं आहेस का ? "

" हा, हा ! ३००० डुकॅट, " शॉयलॉक मध्येच म्हणाला.

" अन् ते तीन महिन्यासाठी, " ॲन्टोनिओनं पुस्ती जोडली.

" हो, हो. ते मी विसरलोच होतो की ! तीन महिने—फक्त तीन महिने. सांगितल होतं मला ते. मग काय ? आपण करारनामा लिहून द्या म्हणजे झालं. पण आपण मघाशी काय म्हणाला ? व्याजबट्ट्याचा व्यवहार आपण करीत नाही, असं काही म्हणाल्याचं माझ्या कानी आलं. खरं का ते ? "

शॉयलॉकच्या या दांभिक व कुत्सित बोलण्याचा ॲन्टोनिओला चागलाच राग आला. पण करणार काय ? ' अडला हरी ! गाढवाचे पाय धरी ' अशी त्याची स्थिति झाली होती. त्याने संथपणे एवढेच उत्तर दिले.

" होय, मी व्याजबट्ट्याचा व्यवहार करीत नाही. ख्रिश्चन धर्मात व्याज घेणं निषिद्ध मानलं आहे. "

पण त्याची कुचाळी करण्याची ही नामी संधि शॉयलॉक कशी दवडील ? विस्तवावर पापड जसा इकडून तिकडे परतून भाजावा, तसा शॉयलॉक त्या ख्रिश्चनाच्या भावना भाजून काढीत होता—आणि त्याहि मिस्किलपणाने.

" पण काय हो, आपल्या बायबलामध्यें जेकबची कथा आहे ना ? त्याचा चुलता लेबन त्याच्या खुणा केलेल्या लहान मेंढ्या जेकबन राखणीस घ्याव्यात असा करार झाला होता ना ? जेकब त्या मेंढ्या चारीत राहिला. पुढे त्या वाढल्या अन् त्याची पैदासहि वाढली. नव्या जन्मास आलेल्या मेंढ्याहि जेकबच्याच मालकीच्या झाल्या. माणसाची भरभराट अशीच होते. कोणी कोणाची चोरी करूं नये म्हणजे झाल. "

ही पुराणांतील कथा सांगण्यांत शॉयलॉकचा हेतु काय?—तर आपल्या सावकारीचें समर्थन करणें. ' जेकबच्या एका मेंढीच्या दहा मेंढया झाल्या, तसा आपला पैसा वाढतो, त्यांत गैर काय? पाप काय?' असा प्रश्न त्याच्या या कथा-निवेदनांत दडलेला होता. तो ओळखून ॲन्टोनिओनें उत्तर दिलें, " म्हणजे? जेकबनं व्याज घेतलं असं का तुम्हाला म्हणायचं आहे? निसर्गाच्या नियमाप्रमाणं मेंढ्या वाढत गेल्या, तसं तुमचं सोनं-रुपं आपोआप वाढतं कीं काय? पैसा-अडका म्हणजे काय शेळ्या-मेंढया आहेत?"

असे म्हणून ॲन्टोनिओनें शॉयलॉककडे तीव्र तिरस्कारयुक्त नजर टाकली. कारण त्याच्या धर्मभावनेला शॉयलॉकने, आपल्या स्वार्थाला मुलामा देण्यासाठीं, दुखविलें होतें. बॅसानिओकडे वळून ॲन्टोनिओ रागारागानें म्हणाला, " सैतान धर्मग्रंथाचा आधार आपल्या कामापुरता कसा घेतो पहा. दुष्ट माणसानीं पवित्र गोष्टींची साक्ष दिली म्हणजे माझ्या डोळ्यापुढं एखादा दुर्जन हसत हंसत उभा आहे असं वाटतं. आतून किडलेलं सुंदर सफरचंदच तें! खरोखर लबाड माणस बाहेरून किती सुंदर मुखवटा चढवितात!"

परंतु शॉयलॉकचें कातडें जाड होतें. असल्या टीकेच्या टाचण्यानीं त्याला भोकें पडत नव्हतीं. ' कोणी निंदा कोणी वंदा! अमुचा स्वहिताचा धंदा!' हा त्याचा बाणा. चटकन् तो आपल्या धंद्याकडे वळून म्हणाला,

" ३००० डुकॅट पाहिजेत ना? चांगली गरगरीत रक्कम आहे ही तिला मुदत तीन महिन्याची का? मग हिशेब केला पाहिजे. व्याजाचा दर—"

" म्हणजे शॉयलॉक, तुम्ही आम्हाला व्याजानं कर्ज देणार कीं काय?" ॲन्टोनिओनें सरळपणें विचारलें. त्याची भोळी भावना अशी कीं आपल्या पतीवर, अल्प मुदतीसाठीं, शॉयलॉक ही रक्कम हातउसनी देत असेल. प्रेताच्या टाळूवरील लोणी खाण्याइतकी त्याची सावकारी वृत्ति त्याला माहीत नव्हती. पण आता ती माहीत होण्याचा प्रसंग आला. तो त्याच्या तावडींत पक्का सापडला. जाळ्यांत सापडलेलें हरीण पारधी सोडील होय? शॉयलॉकनें त्याच्यावर पुरा सूड उगविण्याचाच चंग बांधला. आतापर्यंत मनांत साचत आलेल्या ख्रिश्चनांवरील—विशेषत: ॲन्टोनिओवरील—क्रोधाचा स्फोट आज तो करूं लागला. दांत ओठ चावीत व इकडून तिकडे फेऱ्या मारीत तो म्हणाला,

" ॲन्टोनिओ महाशय, आपल्या ' महाजन मंडळात ' आपण जमलों असतां, आपण माझ्या सावकारीचा आणि संपत्तीचा उपहास किती वेळा केला आहे ? तो सारा मी शांतपणं सहन केला, कारण सहन करणं हा आमच्या जातीचा गुणच आहे. त्याचा ताम्रपटच आम्हांला मिळाला आहे म्हणा ना ! "

जुन्या आठवणी उकरून काढण्यात शॉयलॉक आपल्या डोक्यावर घणाच हाणीत आहे, हें पाहून ॲन्टोनिओ मतप्त झाला. बॅसानिओ तर नुसता जळू लागला. पण करणार काय ? दोघांचेहि हात दगडाखाली सापडले होते. ते गरजू होते, याचक होते. म्हणून सावकार जें जें बोलेल, तें तें ते निमूट ऐकून घेत होते. त्या दोघांची शांत वृत्ति पाहून शॉयलॉकला अधिकच चेव आला. ॲन्टोनिओकडे हात करून तो त्वेषानें चीत्कारला,

" ' कुतरडा ' ' पाखंडी ' अशा शिव्या तुम्हींच मला दिल्या नव्हत्या काय ? आणि माझ्या या ज्यू अंगरख्यावर तुम्हींच थुंकला नव्हतां काय ? आणि हें सारं कशासाठीं ? माझ्या कोणत्या अपराधासाठीं ? तर माझ्या संपत्तीचा मी माझ्या मनाप्रमाणं उपयोग करतों म्हणून. जें माझं स्वतःच, माझ्या मालकीचं, त्याच्या वापराबद्दल ही मला शिक्षा ! आणि आता मात्र तुम्ही मजकडे येता आणि म्हणता, ' शॉयलॉक, आम्हाला पैशाची गरज आहे ', मी तुम्हाला काय जबाब देऊं ? आपल्या घराच्या उंबरठ्यावर, एखाद्या पिसाळलेल्या कुत्र्याला तुम्ही जसं हाणता, हाकता, तसं तुम्हीं मला झिडकारलं—लाथाडलं आहे. कुत्र्याजवळ का पैसे असतात ? ३००० चें कर्ज देणं कुत्र्याला शक्य असतं का ? असं मी का म्हणूं नये ? '

लोखंडी घणाचे घावामागून घाव आपल्या डोक्यावर पडत आहेत, असें त्या गरजवंत मित्रद्वयाला शॉयलॉकचे बोलणें ऐकताना, वाटत होतें. पण आतां त्यांना शॉयलॉक थोडाच मोकळे सोडणार ? ते त्याच्या कचाट्यात पक्के सापडले होते. आणि त्या संधीचा तो पुरेपूर फायदा घेत होता. त्याच्या चित्तांत दीर्घकाळ साचत आलेल्या अपमानाचा सूड तो आज उगवीत होता. आणि सरळ प्रहारापेक्षा तिरपा आघात जास्त तीक्ष्ण, सरळ टीकेपेक्षा उपरोधिक टीका जास्त तिखट. ती डोक्यावर मारीत नाहीं, पण कुशीत आपलें विषारी टोंक खुपसते.

एखाद्या वाघाने हरणासारखें सावज पकडावें, फाडावें आणि त्याचें मांस आपल्या दातांनीं तोडावें व त्या सावजाच्या अंगावर उभे राहून त्या हिंस्र प्राण्यानें विजयी मुद्रेनें इकडे तिकडे पहावें. त्या साऱ्या परिस्थितीचा स्वामी बनलेला शॉयलॉक मोठ्या गर्वानें आपली नजर तशी फिरवूं लागला व त्या दोन ऋणकोंकडे आढ्यतेनें पाहूं लागला. आणि एकदम दुष्टपणानें तो हंसला. त्याला वाटलें, त्याची चेष्टा करावी. एखाद्या गुलामाप्रमाणें आपलें शिर लववून व हात जोडून, अदबीनें व अजीजीनें, उपरोधिक सुरात तो बोलूं लागला,

"नाहीं तर महाराज, मी आपणाला असें उत्तर देऊं का ?"—'सज्जनहो, गेल्या बुधवारीं आपण माझ्या अंगावर थुंकलात. अन् गुरुवारीं आपण मला हांकलून दिलेत. अन् तिसऱ्या दिवशीं आपण मला कुत्रा म्हटलेत. या आपल्या उपकाराबद्दल मी आपल्याला पाहिजे असलेली रक्कम पेश करीत आहें.'"

शॉयलॉकची ही शाब्दिक कट्यार अँन्टोनिओसारख्या सभ्य व स्वाभिमानी माणसाच्या काळजातच बुसली. तो मानी होता, धनिक होता व प्रेमळ होता. मित्रप्रेमाच्या किती उदात्त भावनेनें तो हें कार्य करीत होता; पण त्याच्या या भावनेची अवहेलना झाली, ती त्याला कशी खपेल ? त्याचा संयम सुटला, स्वतःच्या स्थितीचें भान गेलें आणि तो शॉयलॉकवर उफाळून उबड म्हणाला,

"होय, होय, मी तुला पुनः तसेंच बोलेन—तुझ्याशीं पुन: तसाच वागेन. थुंकेन, मी तुझ्या अंगावर थुंकेन आणि तुला लाथा मारून हाकलून लावीन. काय समजलास तूं ? तूं जर आम्हाला कर्ज देणार असशील, तर तें मित्राला म्हणून देऊं नकोस. मित्र मित्राकडून कधीं व्याज घेतो काय ? आपल्या शत्रूला आपण पैसे उसने देत आहोंत, याच भावनेनें तूं आम्हाला पैसे दे. म्हणजे आम्ही करार मोडला तर तुला त्याचा दंड उजळ माथ्यानें वसूल करता येईल."

अँन्टोनिओच्या ताफत्यान्याचा हा सरळ मारा शॉयलॉकला अनपेक्षित होता. तो त्याला असह्य झाला. 'गरज, तर गरज, पण गर्व किती !' असा विचार त्याचे मनात आला. तो त्याला सवाई कडक भाषेत बोलूं शकला असता—किंवा कर्ज देण्याला साफ नकारहि देऊं शकला असता. पण या दोन्ही गोष्टी त्याला करावयाच्या नव्हत्या. अँन्टोनिओला आपल्या पाशात

करकचून बांधून टाकावयाचे आणि शेवटीं त्याचेवर पुरा सूड उगवावयाचा, असा दूरदर्शी व्यूह त्याच्या खुनशी मनानें रचला होता. म्हणून एखाद्या सराईत नटाप्रमाणें रागाचा सारा आविर्भाव पुसून टाकून, एकदम प्रेमाचा अभिनय करून तो म्हणाला,

" अरे, किती खवळता तुम्ही ? मला तुमची मैत्री हवी आहे, तुमचं प्रेम हवं आहे. आपण पूर्वीचे सार सार विसरून जाऊं या. तुम्ही माझ्या तोंडाला जी काळोखी फासली आहे, ती सारी मी विसरून जातो. आणि तुमची आताची गरज भागवितो. अन् लक्षात ठेवा, माझ्या पैशाचं व्याज म्हणून मी एक पैसुद्धा तुमचेकडून घेणार नाही. मान्य आहे ना तुम्हाला हे ?"

बॅसानिओ खुलला. आपले काम होणार म्हणून तो आनंदला. त्या आनंदाच्या भरात तो म्हणाला,

" वा ! केवढी ही आपली कृपा ! "

" होय, मी खरोखरच मोठी कृपा करणार आहे. चला, आपण जाऊं या नोंदणी-कचेरींत तिथं एकट्या ॲन्टोनिओनं मला करार करून द्यावा म्हणजे झाल आणि एक गमत म्हणून, एक चूप म्हणून, त्या करारात असं कलम घालावं– "

एवढे बोलून शॉयलॉक हंसला आणि अमळ थांबला व त्या दोघाकडे बारीक नजरेने पाहूं लागला. त्या दोघाना या नव्या कलमाची काहीच कल्पना येईना...गंमत खरी पण ती शॉयलॉकची—ती कशी असेल, याचा थाग कोणास लागेल ? अस्वलाचे प्रेम म्हणजे गुदगुल्यानीं ठार करणेच. ते दोघे अधीरतेने शॉयलॉकचे पुढील शब्द ऐकू लागले—

" एक मौजेचा खेळ म्हणूनच हं. यापलीकडे त्याला काही किमत नाही. पण गमतीनं आपण त्या करारात असं कलम घालूं —' अमूक दिवशी अमूक ठिकाणी, अमूक रक्कम तुम्ही मला परत केली नाहीं तर, त्याचा दंड म्हणून—केवळ गमतीनं आपण लिहूं—मी तुमच्या शरीरातील, मला वाटेल त्या भागातून एक पौंड मास काढून घ्यावं. " असें म्हणून शॉयलॉकने हो: हो: हो: करून इतके विकट हास्य केले की, त्या हास्याच्या धबधब्यात त्याची ती कुटिल व हिंस्र अट धुवून वाहून जावी. त्यामुळे ॲन्टोनिओ चटकन्

म्हणाला, " खूप खूप ! मी खरोखर खूप आहे ! मला ही अट मान्य आहे. अशा करारावर सही करण्यास मी राजी आहे. ज्यू लोक पुष्कळच दयाळू असतात, असं मी यापुढं म्हणत जाईन. "

पण शॉयलॉकच्या त्या क्रूर अटीचा अघोरपणा बॅसानिओला जाणवला. आपल्या प्रेमासाठीं आपल्या मित्राचे प्राण त्या नरमांस-भक्षक अटींत गुंतून रहावेत, हें त्याला कसे सहन होईल ! तो एकदम आवेशानं ओरडला,

" नाहीं, नाहीं, असं होणार नाहीं. माझी पैशाची गरज तशीच राहू दे. मला त्याचं दुःख नाहीं. "

आपल्या पैशासाठीं आपल्या मित्राचा गळा सावकारी पाशांत गुंतला जाऊं नये, म्हणून बॅसानिओ तळमळत होता. ती त्याची तळमळ ॲन्टोनिओनें बरोबर जाणली. पण तो दिलदार दोस्त होता. आणि त्या क्रूर कलमाची अंमलबजावणी करण्याची पाळी कधींच येणार नाहीं अशी त्याला खात्री होती. म्हणून ॲन्टोनिओ बॅसानिओला म्हणाला,

" मित्रा, भिऊ नकोस. शरानं साहसाला का भ्याव ? कर्जफेडीची मुदत मी चुकविणार नाहीं. अरे ती मुदत संपण्याच्या आधींच एक महिना मी सारे पैसे फेडून टाकीन ना ! त्यात काय आहे ? दोन महिन्यांत माझीं सारीं गलबतं परत येतील आणि या कर्जाच्या तिपटीच्या तिप्पट पैका मला आणून देतील. तूं का घाबरतोस ? करून टाकूं हा करार आपण ! "

आता कोळ्याच्या जाळ्यात ते दोन्ही मासे पुरे सापडले. त्या जाळ्याला गांठ मारण्याचें काम तेवढें राहिलें होतें. जाळ्यांतील माशांची तडफड पाहून कोळी मनातल्या मनात हंसत होता. ते मासे त्याला चिरून, भाजून, तळून खावयाचे होते. पण आता दाखवायचें होतें कीं आपण माशांवर दयाच दया करीत आहोंत. म्हणून शॉयलॉक उद्गारला,

" देवा ! देवा ! काय हे ख्रिश्चन लोक आहेत ! ते स्वतः वाकड्या वाटेनें व्यापार करतात आणि म्हणून दुसऱ्याच्या मनांतहि वाकुडपणा असेल असा संशय घेतात. "

आणि त्या दोघां ख्रिश्चन ऋणकोंकडे स्नेहार्द्र दृष्टीनें पाहून अत्यंत प्रेमळ स्वर काढून तो बोलूं लागला. नम्र भाषेत शॉयलॉक त्या दोघांना म्हणाला,

" मित्रहो, कृपा करून तुम्ही मला हे सांगा! तुम्ही मुदत न पाळली तर मला काय लाभ? ॲन्टोनिओचं पौंडभर मांस घेऊन मला काय फायदा? माणसाचं पौंडभर मांस हे काही मोठं मोलाचं नाही, फायद्याचं नाही. गाईच्या, शेळीच्या मांसाइतकंहि नव्हं. हे इतकं सारं मी कशासाठी बोलतो आहे?— मी माझ्या मैत्रीचा हात पुढं का करीत आहे? तर ॲंटोनिओची कृपादृष्टि मजवर असावी म्हणून. त्याला पाहिजे असेल तर त्यानं माझा मैत्रीचा हात धरावा! नाही तर आपला रस्ता सुधारावा. मी सुखानं रामराम ठोकीन. पण मला निष्कारण दुखवू नका, माझ्यावर अन्याय करू नका."

"बरोबर आहे, शॉयलॉक तुझं म्हणणं बरोबर आहे. मी तुझ्या करारावर सही करीन." ॲन्टोनिओने चटकन् निकाल लावला.

झाले! ठरले! त्या दोघांनी नोंदणी-कचेरीत तावडतोब जावयाचे अन् करार लिहून तयार ठेवावयाचा, तोंवर शॉयलॉकने ३००० डुकॅट थैलीत घेऊन कचेरीत यावयाचे, असें एकमताने ठरले. 'आपली फत्ते झाली!' असे मानून शॉयलॉक तेथून आनंदाने झपाझप पावले टाकीत निघाला. त्याच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पाहून ॲन्टोनिओच्या तोंडून सहज उद्गार निघाले,

" धन्य आहेस बेटा. ज्यू ख्रिश्चन होणार! त्याच्या मनात दया अंकुरत आहे."

पण बॅसनिओला तसे वाटले नाही. त्याला शॉयलॉकचे भय वाटले—त्याच्या दयेचे, त्याच्या उपकाराचेहि भय वाटले. "कारण" तो म्हणाला, " चांगले करार व वाईट माणसे ही जोडी मला आवडत नाही." पण त्याची चिंता दूर करण्यासाठी ॲन्टोनिओ उल्हासाने म्हणाला,

" चला, एक तर काम झालं. आणि यांत चिंता करण्यासारखं तरी काय आहे! मुदतीच्या आधी एक महिना माझी गलबतं हमखास परत येणार."

आणि ते तिघेहि नोंदणी-कचेरीत एकत्र जमले व त्यांनी तो करार पूर्ण केला. त्यावेळीं आपले प्रणयाराधनेचे कार्य सफल होणार म्हणून बॅसानिओ आनंदला. आपण आपले मित्र-कार्य अडचणीतूनहि पार पाडले या विचारानें ॲन्टोनिओ सुखावला, आणि या दोघा ख्रिश्चनांची आपण चांगलीच गठडी

चळली, या कल्पनेनें शॉयलॉक मनात फुरफुरला. पण दैवी भवितव्यता त्या तिघांकडेहि पाहून हंसत होती. कोणाचा आनंद, कोणाचे सुख, कोणाचा हर्ष अखेर टिकणार हे तिला—फक्त तिलाच—माहीत होते.





## ★ लग्नाचा पण : २

दोन तरुणी. एक मालकीण व दुसरी तिची दासी. मालकिणीचें नाव पोर्शिया व दासीचें नाव नेरिसा.

पोर्शिया ही एका सधन सरदाराची कन्या. वेलमॉट शहरात जे काही चार श्रीमंत, प्रतिष्ठित व कीर्तिमान सरदार होते, त्यामध्ये पोर्शियाच्या वडिलाची गणना होत असे. 'तो एक देवमाणूस आहे,' असा त्याचा लौकिक सर्वत्र पसरला होता. तो मृत्यु पावला, पण कीर्तिरूपे उरला होता. त्याने आपल्या मागे मोठी कीर्ति ठेवली होती—आणि तशीच अलोट संपत्तिहि पण ठेवली होती.

त्या अफाट संपत्तीची मालकीण होती एकटी पोर्शिया. तिथे जमीनजुमला, घरेवाडे, दागदागिने, गाड्याघोडे या सर्वांची अगदी रेलचेल होती आणि त्याची स्वामिनी होती पोर्शिया.

पोर्शिया अत्यंत लावण्यवती होती. ऐन तारुण्यानें आता ती मुसमुसलेली होती. स्वभावानें फार गोड मुलगी होती. आणि तशीच ती कर्तृत्ववानहि होती. कोणाशीं कसे वागावे हें ती बरोबर जाणत होती. तिचा स्वभाव खेळकर असला तरी तिचें वागणें नेहमी प्रतिष्ठित असे—आपल्या घराण्याच्या लौकिकास साजेसे असे. तिच्या बोलण्यात काव्य असे, विनोद असे, शहाणपण असे. तिचें मन मृदु व वृत्ति उमदी होती. तिचें नेरिसावर—आपल्या दासीवर फार प्रेम होतें. जिवाभावाच्या मैत्रिणीप्रमाणेंच ती नेरिसाला मानी.

"या जगाचा मला अगदीं कंटाळा आला आहे, बाई !" पोर्शिया आज नेरिसाला म्हणत होती. ती आपल्या भव्य वाड्याच्या प्रशस्त दिवाणखान्यात बसली होती. तेथील सारें सामानसुमान मोठ्या ऐश्वर्याचें द्योतक होतें. तेथें श्रीमंती जणूं उतूं जात होती. असें वैभव आणि असें यौवन असतानाहि आपली धनीण जगाला कंटाळत आहे, हें पाहून नेरिसाला नवल वाटलें. पण ती हुशार होती. पोक्त माणसाप्रमाणे ती आपल्या धनिणीला तत्त्वज्ञान सांगूं लागली.

"बाईसाहेब, आपलं म्हणणं मी खरं मानलं असतं; पण केव्हा ? आपल्या संपत्तिइतकीच विपुल विपत्ति आपल्याला असती तर ! पण आपलं नशीब शिकंदर. आपल्याला सुख पर्वताएवढं अन् दुःख जवापाडं. पण खरं सांगूं का बाईसाहेब ? ज्याच्याजवळ काहींच नसतं ते जितके दुःखी असतात, तितकेच, ज्याच्याजवळ अति असतं, तेहि दुःखी असतात. 'अति तेथें माती' म्हणतात, ते काहीं खोटं नाहीं. कोणतीहि गोष्ट कशी प्रमाणात हवी."

"किती ग सुंदर विचार आहेत तुझे ! अन् ते मांडलेस तरी किती सुंदर भाषेत !" पोर्शियानें कौतुकाचे उद्गार काढले. पण केवळ कौतुकात बुडून जाणारी नेरिसा नव्हती. तिनें लगेच उत्तर दिलें, "बाईसाहेब, विचार काय ? पुष्कळ सुंदर असतात ! पण त्याचं खरं महत्त्व ते आचरणात आणले तरच."

"अग, तें मला कळत का नाहीं ? पण आपल्याला जें योग्य वाटतं, तसं वागणं ही काहीं सोपी गोष्ट का आहे ? ती तशी असती, तर मठाचीं मंदिरं बनलीं असती आणि रंकाच्या झोपड्या या राजवाड्यासारख्या झाल्या असत्या. जो जसा लोकांना उपदेश करतो, तो तसा स्वतः तरी वागूं शकतो

का ? बुद्धीनं बरं-वाईट आपण पुष्कळ ठरवितो, पण तस वागणं आपल्या हातून थोडंच होतं ? कारण आपलं मन आहे, भावना आहेत अन्—"

आणि पोर्शिया बोलता बोलता एकदम थबकली. सर्वसामान्य मानवी स्वभावाचा विचार ती बोलून दाखवीत होती, पण मध्येंच तिला स्वतःच्या परिस्थितीची जाणीव झाली. ती आपल्या हृदयात डोकावून पाहूं लागली. तेथे तिला आपली इच्छा किती बंधनानी जखडलेली आहे हे दिसू लागले. आणि म्हणून तिचे बोलणे एकदम् खुंटले. ते पुन्हा चालू करण्यासाठी नेरिसा आर्जवी स्वरात म्हणाली, " काय झालं बाईसाहेब ? बोला ना, पुढं बोला ना. "

" काय बोलू ? नेरिसा, गरिबाच्या मुलीला असत तितकहि स्वातंत्र्य मला नाही ग. सर्वसामान्य मुलीना पति निवडण्याचं जितक स्वातंत्र्य असत, तितकहि मला नाही. ' निवड ' हा शब्दच मुळीं माझ्या लेखी नाही. मला आवडेल तो तरुण मी निवडू शकत नाही, आणि मला जो आवडणार नाही तो मी नाकारू शकत नाही. किती ग विचित्र दशा आहे माझी ही ! दिवगत वडिलाच्या मृत्युपत्रानं या त्याच्या जिवत कन्येची इच्छा जखडलेली आहे, हें दुर्दैवच नव्हे का नेरिसा ? "

पोर्शियाचें म्हणणे खरे होते. ती मोठया पेचात सापडली होती. कारण तिच्या वडिलानी मरतेसमयी तिच्या विवाहाबद्दल एक विलक्षण अट घालून ठेवली होती. जणू तो एक पणच होता. सोन्याची, चादीची व शिशाची अशा तीन पेटया त्यानी ठेवल्या होत्या. आणि त्या प्रत्येकीवर पुढीलपैकी एकेक वचन लिहून ठेवलेले होते.

**जो माझी निवड करील त्याला बहुत माणसांचे इच्छित गवसेल.**
**जो माझी निवड करील त्याला त्याच्या योग्यतेइतकें मिळेल.**
**जो माझी निवड करील त्याला आपले सर्वस्व सोडावे लागेल.**

एका पेटींत पोर्शियाची प्रतिमा ठेवली होती. ती पेटी जो अचूक हेरील, त्याच्या गळयात पोर्शियानें लग्नाची माळ घालावयाची होती. आणि जो हरेल त्याला फार कडक शासन ठेवले होते. ते म्हणजे त्या पराभूत प्रेमवीराने आपण कोणती पेटी उघडली हे कोणालाहि सागता कामा नये. याहूनहि अधिक कठिण अशी अट त्याला पाळावी लागे; अन् ती म्हणजे, त्याने

आपल्या साऱ्या जन्मात दुसऱ्या कोणत्याहि कुमारिकेचें लग्नासाठीं प्रणयाराधन करता कामा नये. आणि असे अपयश पदरी पडताच त्यानें पोर्शियाच्या वाड्यातून तत्काळ पाय काढता घेतला पाहिजे.

हीं त्या तीन पेट्यावरील तीन विलक्षण वचनें वाचून प्रत्येकजण बुचकळ्यांत पडे. पोर्शियाचें अप्रतिम लावण्य, अलोट ऐश्वर्य आणि असामान्य सुस्वभाव याची कीर्ति दशदिशा दरवळत होती. त्यामुळे देशोदेशींहून श्रीमन व महत्त्वाकांक्षी तरुण बेलमॉट शहरीं मोठ्या ईर्षेनें येत. पण काय ? त्या तीन गूढ पेट्या व त्यावरील तीं तीन गूढ वचनें पाहून त्यांच्या तोंडचे पाणी पळे. आणि ते स्वतःच मागच्या पायानें पळ काढीत. फ्रान्स, जर्मनी, इंग्लंड अशा नाना देशातून श्रीमंत व सुंदर तरुण पोर्शियाच्या पाणिग्रहणासाठीं बेल्मॉटला येत होते. पोर्शियाने त्याना पसन-नापसत करण्याचा प्रश्नच नव्हता. त्याचें नशींब त्या तीन पेट्यावर आपटून चक्काचूर होऊन जात होते !

पोर्शियाच्या पसंती-नापसतीचा आवडी-निवडीचा कांही प्रश्नच नव्हता हें खरें; पण तिचें मनोगत ताडून पहावें किंवा नुसतें तिला बोलतें करून, तिचे मन रिझवावे, या हेतूनें, त्या चतुर दासीनें पोर्शियाला विचारलें, " बाईसाहेब, मला आपलं उगाच सांगा हं. हे एवढे श्रीमंत राजपुत्र आपल्याला मागणी घालण्यासाठीं येथवर आले, त्याच्यापैकी कोण आपल्या मनांत भरला ? कोणी आपलं हृदय जिकलं ? कोणावर आपलं प्रेम जडलं ? खरं, खरं सागा ह. "

नेरिसाचा हा प्रश्न ऐकून पोर्शियाची कळी खुलली. स्वतःविषयीं बोलायला कोणाला आवडत नाही ? आणि त्यात स्वतःच्या प्रेमाविषयीं बोलायला तर प्रत्येकजण उत्सुक असतो. तशाच उत्सुकतेने, पण आपल्या भावना कांहीशा लपवीत पोर्शिया म्हणाली,

" अग वेडे, ' बहुत नृपति ते आले गेले. ' त्यातून कोणाची काय आठवण राहणार ? तूंच आठवण करून एकेकाचं नाव माग म्हणजे मग मी सागेन तुला माझं मत. "

" प्रथम आला तो मला वाटतं, नेपोलियनच्या घराण्यातील राजपुत्र. "

" तो होय ? तें एक शिगरूं होतं. सदा न् कदा घोड्याविषयी बोलण अन् त्याचा त्याला केवढा अभिमान ! " असे म्हणून पोर्शिया हंसूं लागली.

नंतर नेरिसाने दुसऱ्या एका सरदाराचें स्मरण तिला करून दिले. त्याचें नाव ऐकताच कपाळाला आठ्या चढवून पोर्शिया म्हणाली “नको ग बाई! तो भलताच संतापी. तो मौजेच्या गोष्टी ऐकतानाहि हसत नाही. त्याचा चेहरा सदा उग्र नि गभीर. मोठा झाल्यावर ‘रडका तत्त्वज्ञ’ होईल तो, मी सागून ठेवते, बघ. ‘करतेस कीं नाही माझी निवड?’ अशी दमदाटी तो देत आहे असंच त्याच्या मुद्रेकडे पाहिल म्हणजे वाटे. त्याच्यापेक्षा भुताशी लग्न करणं काय वाईट बाई।”

नंतर नेरिसानें एका फ्रेंच उमरावाची मूर्ति पोर्शियाच्या मनःश्चक्षूंपुढें उभी केली. “तो हो कसा काय वाटला तुम्हाला?” तिनं विचारले.

त्याची आठवण होताच पार्शिया खो खो करून हसून म्हणाली,

“नेरिसा, कोणाची चेष्टा करणं हे पाप आहे, हे मला माहीत आहे पण खरं सागू का तुला? देवानं त्याला माणसाच्या जन्माला घातला आहे, म्हणूनच त्याला माणूस म्हणायचं. किती लहरी, किती छांदिष्ट! त्याच्याशी लग्न करण म्हणजे वीस नवऱ्याशी लग्न करण आहे.”

“आणि तो इंग्लंडचा सरदार?” नेरिसाने डिवचले.

“त्याच्याविषयी ग मी काय बोलणार? त्यानं मला ओळखलं नाहीं अन् मी त्याला ओळखलं नाही. त्याला इटालियन भाषा येत नव्हती. फ्रेंच, लॅटिन याहि भाषा येत नव्हत्या अन् माझं इंग्रजीचं ज्ञान तर विकटोपर्यंतहि नाही हे तुला माहितच आहे. अशा मुक्याशी कोण कस बोलणार बाई? अन् त्याचा वेष तरी किती विचित्र! मला वाटतं, त्यानं आपला कोट इटालीतून, टोपी जर्मनीतून अन् पायमोजे फ्रान्समधून आणले असावेत. आणि चैनीची चाल-चलणूक पृथ्वीच्या पाठीवरील प्रत्येक देशातून त्यान उचलली असावी.”

“अन् स्कॉटलंडमधला तो लॉर्ड. त्याच्याविषयी आपलं मत काय आहे?”

“अग, तो त्याचाच शेजारी!”

“आणि तो जर्मन ड्यूकचा पुतण्या तरी आपल्या पसंतीस कितपत उतरला?” नेरिसाने विचारले.

त्याच्याबद्दल तीव्र तिटकारा दाखवीत पोर्शिया म्हणाली, “तो जवळ जवळ पशूच आहे. अगाची सावलीसुद्धा मला नको.”

" पण बाईसाहेब, आपण ती चिंताच नका करूं. या साऱ्या राजपुत्रांनीं नि सरदारपुत्रांनीं आपल्या घरचं प्रस्थान केव्हाच ठेवलं. आपल्या वडिलांच्या कडक अटीनं सारेजण घाबरून गेले आहेत. त्या अटी आपण बाजूस ठेवल्या..."

" छे: छे: असं कसं होईल? पिताजींचं वचन मला मी पाळलंच पाहिजे. मग त्यापायीं मला आमरण कुंवारीण रहावं लागलं तरी बेहेत्तर!" पोर्शिया निश्चयानें म्हणाली. कारण तिची पितृभक्तिच तशी होती. आणि शिवाय आतापर्यंत तिला मागणी घालण्यासाठीं आलेल्यांत असा एक जणहि नव्हता कीं ज्याच्या वियोगामुळें तिनें झुरावें.

इतक्यांत नेरिसाला एका तरुणाची आठवण होऊन ती पोर्शियाला म्हणाली,

" बाईसाहेब, आपल्याला आठवतं का? आपले पिताजी हयात असतांना व्हेनिस शहरांतून एक तरुण एका सरदाराबरोबर आलेला होता. तो मोठा विद्वान होता नि शूरहि दिसत होता."

हा उल्लेख ऐकताच पोर्शियाच्या डोळ्यापुढें एक मूर्ति उभी राहिली. तिची आठवण करीत ती म्हणाली,

" होय ग होय. त्याचं नांव बॅसानिओ होतं असं मला वाटतं."

" बरोबर आहे बाईसाहेब. मी पाहिलेल्या साऱ्या तरुणांत तोच चांगला होता—सुंदर स्त्रीच्या कृपेस पात्र होण्यासारखा होता."

" या तुझ्या स्तुतीला तो पात्र होता असं मला आठवतं—अगदीं पक्कं आठवतं."

त्या दोघींचें असें हितगुज चाललें असतानाच एक नोकर आंत आला. त्यानें वर्दी दिली कीं, चार पाहुणे आज परत आपल्या गांवीं जात आहेत आणि म्हणून ते आपला निरोप घेण्यासाठीं येत आहेत. त्याबरोबरच त्या नोकरानें अशीहि वर्दी दिली कीं, मोरोक्कोचा राजपुत्र रात्रींच येत आहे.

या दोन्ही वार्ता ऐकून पोर्शियाला मोठी गंमत वाटली. चौघांचा निरोप-समारंभ व एकाचा स्वागतसमारंभ—दोन्ही एकाच दिवशीं, एकाच आनंदी भावनेनें साजरे करावयाचे हा योग किती मौजेचा! जाणाऱ्यासाठीं एक दरवाजा उघडावयाचा तर येणाऱ्यासाठीं तोच दरवाजा उघडावयाचा!

हा नवा पाहुणा आला तो मोठ्या भपक्यानें व थाटामाटानें. त्याचेबरोबर जे चार नोकर आले होते, तेहि मोठ्या रुबाबांत होते. हा मोरोक्कोचा

राजपुत्र. मोरोक्को हे ऑफ्रिकेतील एक राज्य. अत्यंत संपन्न. पण तेथील उष्ण हवेमुळे सर्वांचा वर्ण अगदीं काळाकुट्ट. त्याची जाणीव या राजपुत्राला होती. आणि म्हणून तो कैफियत देण्याच्या सुरात पोर्शियाला म्हणाला,

" माझ्या काळ्या रंगामुळें तुम्ही मला नापसंत करूं नये. हा सारा आमच्या प्रदेशातील उष्णतेचा परिणाम आहे. अगदी उत्तर ध्रुवावरील गोरा-पान माणूस आमच्या भूभागात आणून ठेवला, तर त्याचा वर्णहि असाच होईल. म्हणून तुम्ही माझ्या सौंदर्यापेक्षा शौर्याकडे पहा. "

पण पोर्शियाला पहाण्याचें, निवडण्याचे स्वातंत्र्य होतें कुठे ? तिच्या लग्नाचा जुगार चालला होता. तिच्या वडिलांच्या विलक्षणपणामुळे तिचें सारे इच्छास्वातंत्र्य हिरावले गेले होतें. ही आपली अगतिक भूमिका तिनें पुन्हा एकदा त्या राजपुत्राला समजावून सांगितली आणि सस्मित मुद्रेने त्याचें स्वागत केलें.

मोरोक्कोचा राजपुत्र पराक्रमी म्हणून प्रसिद्ध होता. त्यानें इराणच्या शहाला आपल्या समशेरीच्या बळावर जिंकले होतें. कोणा शूर माणसाचाहि थरकाप उडवील अशी त्याची उग्र मुद्रा होती. आपल्या भक्ष्यासाठी गर्जना करणाऱ्या प्रक्षुब्ध सिंहाच्या आयाळीला हात घालण्यासहि तो धजला असता. पण येथे त्याच्या शक्तीचा, शौर्याचा, पराक्रमाचा काय उपयोग ? हा अगदीं लग्नाचा सरळसरळ जुगार होता. अशा जुगारात भीम व सुदामा हातात फासे घेऊन खेळावयास बसले व दोघात बलाढ्य कोण हे त्या जुगाराच्या डावावरून ठरूं लागले; तर कोणी सांगावे, भीम हरावयाचा व सुदामा जिंकावयाचा. कारण सारा निर्णय त्या फाशाच्या फेकीवर अवलंबून. सारा अज्ञात दैवाचा आंधळा खेळ !

अशी आपली कुचंबणा होत असल्याची कुरकूर त्या आफ्रिकन राजपुत्रानें केली, तेव्हा त्याला पोर्शिया नम्र स्वरात एवढेच म्हणाली, " अजूनहि आपण या पेटयांची परीक्षा टाळूं शकता. कोणतीहि पेटी न उघडता आपण सुखानं परत जाऊं शकता. पण जर का आपल्याकडून चुकीची फे[illegible] गेली, तर मात्र जन्मभर अविवाहित रहाण्याचं बंधन तुम्हाला प[illegible] आधींच आपण योग्य तो निर्णय घेतलेला बरा. "

पण आशा मोठी वाईट. प्रत्येकाला वाटतें, जुगारात पहिला नंबर आपलाच येईल, आणि म्हणून तो आपल्याजवळ असेल नसेल तें सारें जुगारात घालतो. आपलें ऐश्वर्य, आपलें राज्य, आपले बंधु, फार काय, आपली धर्मपत्नीहि पणास लावण्याचा अधर्म धर्मराज करतो, तो याच आशेच्या नादीं लागून! ही आशा पुण्यशीलाच्या हातूनहि पाप घडविते. मग या आफ्रिकन राजपुत्राची काय कथा? अखेर त्यानें आपल्या नशिबाची परीक्षा पहाण्याचें ठरविलेंच. तो तेथून प्रार्थनामंदिरात गेला. या जुगारात आपल्याला यश मिळावें म्हणून त्यानें प्रभूची प्रार्थना केली आणि दुपारचें जेवण झाल्यावर स्वारी त्या तीन गुप्तमंजुषाच्या महालात जाऊन दाखल झाली.

तेथें त्यानें पाहिलें तों एकाजवळ एक अशा तीन पेट्या ठेवलेल्या— एक सोन्याची, एक चांदीची व एक शिशाची. त्यातील एका पेटीत पोर्शियाचें चित्र ठेवलें होतें. 'तीच पेटी माझ्या हातून उघडली गेली तर?' त्याचे डोळे आशेनें चमकूं लागले. त्याच्या हृदयात आनंदाचे निनाद घुमूं लागले. तो एकेका पेटीपाशीं जाऊन उभा राहिला, त्यावरील एकेक वचन वाचूं लागला, आणि त्या वचनाचें चिंतन बराच वेळपर्यंत करीत राहिला.

प्रथम तो गेला शिशाच्या पेटीपाशीं. त्यावर लिहिलेलें होतें :

**" जो माझी निवड करील त्याला सर्वस्व सोडावें लागेल. "**

तें वचन पुनः पुनः वाचून, त्याचा अर्थ आपल्या मनांत पुनः पुनः घोळवून, तो विचार करूं लागला—'सर्वस्वाचा त्याग अन् तो कशासाठीं? शिशासाठीं? छे, छे, माझं सोन्यासारखं मन या शिशासारख्या क्षुद्र वस्तूवर जडेलच कसं?'

असें म्हणून तो चांदीच्या पेटीजवळ गेला. तिच्यावर लिहिलें होतें—

**" जो माझी निवड करील त्याला त्याच्या योग्यतेप्रमाणें मिळेल. "**

त्या वचनाचा तो अर्थ लावूं लागला. 'माझी योग्यता? खरंच माझी योग्यता किती आहे? मोठी योग्यता आहे माझी—फार मोठी. पण ती या राजकन्येच्या प्राप्तीच्या पुरेशी असेल का? का नसेल? माझं कुळ, माझं ऐश्वर्य, माझी प्रतिष्ठा—आणि मुख्य म्हणजे माझं प्रेम. या सर्व बाबतींत मी या युवतीच्या योग्यतेचा पूर्णपणे आहे यात शंकाच नाहीं. तरी पण एकदा त्या सोन्याच्या पेटीकडेहि पाहिलं पाहिजे.'

त्या चकाकणाऱ्या सुवर्णमंजुषेवरील सुभाषित तो राजपुत्र वाचूं लागला :

" जो माझी निवड करील त्याला बहुत माणसांचें इच्छित गवसेल. "
या वाक्याचा उलगडा तो आपल्याशीं करूं लागला. ' बहुतांचे इच्छित काय असणार? अर्थात् ही लावण्यवती युवति! सारं जग तिची अभिलाषा धरीत आहे. जगाच्या चारी दिशातून तिला मागणी घालण्यासाठी अनेक लोक येत आहेत. त्यामुळें अरबस्तानातील जंगलं व वाळवंटं रहदारीनं गजबजलीं आहेत. पोर्शियाला केवळ पहाण्यासाठी दूर देशांचे युवक, एखाद्या ओढ्याप्रमाणं, समुद्र ओलांडून त्वरेनं येथे येत आहेत. हे सारं कशासाठी? बहुतांचं इच्छित ते हेच—पोर्शियाच. अशा स्वर्गीय सुंदरीची प्रतिमा या शिशाच्या किंवा चांदीच्या क्षुद्र पेटीमध्ये ठेवण्याचा अविचार कोण करील? रत्नाला कोंदण सुवर्णाचंच हवं. '

ही आपली विचारसरणी पूर्ण तर्कशुद्ध आहे अशी त्या राजपुत्राला पक्की खात्री वाटली. आणि त्याने त्या सुवर्णमंजुषेची किल्ली घाईघाईने मागून घेतली. " माझी निवड नक्कीच बरोबर ठरणार ! माझे भाग्य आता खास उघडणार. " अशी आनंदाची आरोळी ठोकून स्वारी पुढे सरसावली.

" माझी प्रतिमा या पेटीत असेल तर मी तुमचीच आहे, " असे सुखदायक शब्द पोर्शियाच्या मंजुळ कंठातून निघालेले त्याच्या कानी पडले. आणि त्यानें मोठ्या उत्कंठेने ती किल्ली चालविली व सोन्याची पेटी हळू हळू उघडली. ' आपल्या आयुष्याचे सोने होणार कीं माती ? ' याचा निर्णय लावणारा तो आणिबाणीचा क्षण ! प्राण डोळयात साठवून त्याने त्या उघडलेल्या पेटीत नजर टाकली, तों काय ?

मेलेल्या माणसाची कवटी ! तिच्या डोळयात लिहिलेले होते :

" जे जे चकाकतें, ते सारे सोनें नसतें. तूं जितका शूर तितकाच शहाणा असतास तर ?— तर, तुझे उत्तर चुकले नसते. "—

जुगाराचा हा निकाल पाहून त्या राजपुत्राची छातीच फाटून गेली. निराशेच्या दुःखाने तो तेथून आपल्या नोकरासह घाईघाईने निघून गेला. तेंव्हा पोर्शियाला सुटल्यासारखे वाटले. तिने समाधानाचा सुस्कारा टाकला. " अशा काळ्याकभिन्न माणसाच्या कपाळी हेंच येवो ! " तिने प्रभूची प्रार्थना केली.

आणि दुसरे दिवशीं–

पुनः त्याच तीन मंजुषांच्या महालात पोर्शिया आपल्या दासीसह आली. कारण आपल्या नशिबाची परीक्षा पहाण्यासाठीं अरॅगॉनचा राजपुत्र तेथे आला होता. त्याला आपल्या कुळाचा मोठा अभिमान होता. आपल्या ऐश्वर्याच्या आढ्यतेमुळे तो सामान्य लोकाना तुच्छ लेखणारा होता. आपण "देवाचे लाडके" अशी घमेंड त्याला होती. म्हणून त्याने शिशाची पेटी अदर्शी विचारातून काढून टाकली. एवढेच नव्हे तर, सोन्याच्या पेटीजवळ जाऊन 'बहुतांचें इच्छित मिळेल' हे तिच्यावरील वचन वाचून तो म्हणाला,

'बहुतांचे इच्छित? हे बहुत कोण? मूर्खांचा बाजार! बाह्यचक्षूंनें दिसेल तें द्रव्यच खरे मानणारे बहुतेक लोक असतात, ते खोलवर विचारच करूं शकत नाहींत. उडत्या पक्ष्याप्रमाणें ते वरवर पहातात. बहुजनाना प्रिय, ते मला मान्य होणार नाहीं. त्या रानटी बहुजन समाजाची आणि माझी बरोबरी आहे काय?'

असे गर्विष्ठपणाचे विचार मनात घोळवीत ते घमेंडानंदन चांदीच्या पेटीजवळ येऊन उभे राहिले.

**" जो माझी निवड करील तो आपल्याला योग्य ते मिळवील. "**

हे त्यावरील वचन वाचून त्याने मान डोलवली. आणि तो मनात म्हणूं लागला, 'खरं आहे. योग्यतेप्रमाणे लाभ हाच खरा न्याय. ज्याला त्याला गुणाप्रमाणेंच प्राप्ति व्हावयास हवी. दैवाचा आधळ्या कोशिंबिरीचा खेळ काय कामाचा? भलत्याला भलतं महत्त्व देऊन कसं चालेल? सत्ता, संपदा व प्रतिष्ठा ज्याला त्याला आपल्या लायकीप्रमाणं मिळते. रंकाला राजा बनवून कसं चालेल? माझ्या अंगीं मोठी पात्रता आहे आणि म्हणून त्या पात्रतेनुसार पोर्शियाची प्राप्ति करून देणारी ही चांदीची पेटीच मी उघडणार.'

घाईघाईनें त्याने किल्ली घेतली व लगबगीनें ती चांदीची पेटी उघडली. पण आत काय होते?

पोर्शियाच्या रमणीय प्रतिमेऐवजी डोळे मिचकावणाऱ्या एका वेड्याचे चित्र! आणि त्याच्या हातात एक पत्र! ते पहाताच हे घमेंडानंदन खवळले, निराशेने बेफाम झाले व किंचाळले, "हीच का माझी योग्यता? हीच का

माझी पात्रता ? या मूर्खाचं तोंड पहाण्याचीच का माझी पात्रता? माझ्या गुणाचं हेच का चीज ? माझ्या मोठेपणाला हेच का बक्षीस ? ”

पण पोर्शियाने त्याला थांबवून म्हटले, “ हां, हां, या योजनेवर अशी टीका करूं नका. तो आपला अधिकार नाही. ”

तो इशारा ध्यानी घेऊन राजपुत्र वेड्याच्या हातातील ते पत्र वाचूं लागला.

**“ कांहीं लोक सांवलीच्याच मागें लागतात तर कांहीं मूर्खांना चांदीचा मुलामा दिलेला असतो. तशीच ही पेटी आहे. चला चालते व्हा येथून. ”**

त्या राजपुत्राने कपाळावर हात मारून घेतला. त्याचे मन म्हणूं लागलें, ‘ मी येथे आलो तो एक मूर्ख मस्तक घेऊन; पण आता परत जात आहें तो मात्र दोन मूर्ख मस्तकांनिशी. ’

पोर्शियाला अभिवादन करून त्या राजपुत्राने त्या स्थानाला रामराम ठोकला. पोर्शियाने पुनः समाधानाचा सुस्कारा टाकला. एका संकटातून आपण मुक्त झालो असेच तिला वाटले. आपल्या पाणिग्रहणासाठी धावून येणाऱ्या एकेका मूर्खाची बडबड ऐकताना तिला मोठे संकट वाटे; आणि त्याच्या पराभवाने ती आनंदित होई. तिच्या मनासारखा, तिच्या प्रेमाला पात्र होण्यासारखा कोणीच तरुण आतापर्यंत तेथे आलेला नव्हता. तसा प्रियकर केव्हा येणार ? का कधींच येणार नाही ? अशी चिंता आता तिला वाटूं लागली. सहा युवक आले नि गेले. पण आपल्या जीवनाचे आणि त्यातील प्रेमाचे कोडे कांहीं उलगडले नाही म्हणून ती कांहींशी कष्टी झाली. “ माझ्यावर प्रेम करणारा, त्या प्रेमासाठी सर्वस्वावर पाणी सोडणारा—”

“ आला आहे, बाईसाहेब, एक दूत आला आहे. ” तिच्या नोकराने तिला तितक्यात येऊन वर्दी दिली. “ व्हेनिस शहराहून एक उमराव येत असल्याची सूचना देण्यासाठी एक नोकर पुढें आला आहे. हा पहा त्याने मौल्यवान नजराणा पण आणला आहे. त्याची भाषा किती नम्र ! वा. फारच नामी माणूस आहे हा. त्याचा धनीहि तसाच नामी असला पाहिजे. ”

“ पुरे, पुरे तुझी प्रशंसा, ” पोर्शिया म्हणाली. आणि तिने नेरिसाला सांगितले, “ पहा बरे, हा कोण प्रेमदूत आला आहे तो. ”

स्वामिनीची आज्ञा ऐकून नेरिसा दाराकडे निघाली. जाता जाता तिने कामदेवाची प्रार्थना केली, “ देव करो नि हा बॅसानिओच असो ! ”



आणि खरेच, बॅसानिओच व्हेनिसहून तेथे येऊन दाखल झाला होता — आपल्या मित्राच्या साहाय्याने, आपल्या मित्राचा निरोप घेऊन !



## ★ शुभ मंगल ........ : ८३

" मित्रा, मी बेलमॉटहून लगेच परत येतों, बघ, " सद्‌गदित स्वरात बॅसानिओ अॅन्टोनिओचा निरोप घेताना म्हणाला. तो व्हेनिसहून बेलमॉट-कडे निघाला होता. तेथे पोर्शीयाचे प्रेम व पाणिग्रहण त्याला लाभावे, अशी अॅन्टोनियाची इच्छा. म्हणून तो बसानिओला म्हणाला,

" छे., छे:, अशी घाई करू नकोस. माझ्यासाठी तूं आपल्या कामात बिघाड होऊं देऊं नकोस. अरे तुझ्या साऱ्या जन्माचं सुख त्यावर अवलंबून आहे ना ? तुझं इच्छित पूर्णपण सफल झालं म्हणजे मगच तू परत ये. तूं इकडली काही काळजी करूं नकोस. शॉयलॉकचा हा करार तूं आपल्या डोक्यातून काढूनच टाक कसा. प्रणयाराधनेच्या दुधात तो मिठाचा खडा कशाला ? मजा कर—मोकळ्या मनानं मजा कर. प्रणयाराधनेची एकच एक कामगिरी तुझ्या मनात ठेव. तुला मी यश चिंतितो. अन् ते तुला प्राप्त होणारच अशी मला मनोमन खात्री वाटते. तुझ्यासारखा चतुर, प्रेमळ—"

असे म्हणतां म्हणतां अन्टोनिओचें अंतःकरण भरून आलें. त्याचा गळा दाटला. त्याच्या तोंडून शब्द बाहेर फुटेना. आता त्याच्या भावना बोलून दाखविण्याचें काम त्याच्या डोळ्यातील अश्रू करूं लागले. आपल्या मित्राला दिसूं नये म्हणून त्यानें आपलें तोंड एकीकडे फिरविलें. आणि एका हातानें त्याच्या कमरेला मिठी मारून त्यानें आपल्या दुसऱ्या हातानें त्याचा हात प्रेमानें पुनः पुनः दाबला.

बॅसानिओहि गहिंवरला. ॲन्टोनिओच्या प्रेमाचा पूर त्याच्याहि अंतःकरणातून वाहूं लागला. त्याचेहि डोळे भरून आले. " तुझ्यासारखा... प्रेमळ... मित्र... साऱ्या... जगात... शोधून... सांपडायचा... नाहीं. " असे प्रेमानें ओथंबलेले शब्द थांबत थांबत त्याच्या तोंडून बाहेर पडले. तरी तेवढ्यानें कांहीं त्याच्या अन्टोनिओविषयींच्या सर्व भावना व्यक्त झाल्या नाहीत. त्याला वाटलें, ' हा आपला मित्र केवळ आपल्यासाठींच या जगात जगत आहे. आपलें जीवन, आपलें सौख्य सारें कांहीं त्याचेवर अवलंबून आहे "

पैशांचें व प्रेमाचें गाठोडें पाठीशीं बांधून बॅसानिओ बेलमॉटला जाण्यासाठीं जहाजावर चढला. पण त्याचें जहाज निघावयाला व शॉयलॉक बंदरावर येण्याला एकच गांठ पडली. शॉयलॉक आला तो आरडत–ओरडत, हातवारे करीत व डोळे गरगरा फिरवीत.

" माझी मुलगी ! माझी मुलगी ! कोठें गेली माझी मुलगी ? एका ख्रिश्चनाबरोबर पळाली माझी मुलगी ! अन् माझा पैका घेऊन कीं हो पळाली ! माझे डागडागिने घेऊन कीं हो पळाली ! न्याय द्या–मला न्याय द्या. सोनें, चांदी, हिरे, मोती यांनी भरलेल्या पिशव्या घेऊन माझी मुलगी चोरून पळून गेली आहे. कायदा काय करीत आहे ? सरकारी अधिकारी काय करीत आहेत ? माझ्या मुलीला–ख्रिश्चन मुलीला अन् माझ्या ख्रिश्चन डुकॅट्सना–साऱ्या साऱ्यांना शोधून काढा. माझ्या हवाली करा. "

शॉयलॉक निराशेनें वेडा झाला होता. आपली मुलगी पळून गेली याचें त्याला दुःख झालें होतें, पण त्याहिपेक्षा अधिक दुःख त्याला झालें होतें तें मुलीनें आपली संपत्ति चोरून नेली याचें. तो वेड्यासारखा हातवारे करीत होता, धावत पळत होता व आरडत ओरडत होता.—" माझी मुलगी ! माझी जिंदगी ! ! "

" माझी मुलगी ! माझी जिंदगी ! ! " हे त्याचेच शब्द उच्चारून रस्त्यातील पोरें सोरें त्याला वेडावीत होती, त्याची चेष्टा करीत त्याच्या मागे लागली होती.



शॉयलॉकला संशय वाटत होता कीं बॅसानिओ ज्या जहाजातून प्रयाण करीत आहे, त्यातूनच आपली मुलगीहि जात असेल. पण शोध करतां सरकारी अधिकाऱ्याना कळलें की, त्या जहाजात त्याची कन्या—जेसिका नाहीं. ती दुसऱ्याच एका जहाजातून आपल्या ख्रिश्चन प्रियकराबरोबर त्याच रात्री पळून गेली होती

त्या रात्री बॅसानिओला निरोप देण्यासाठी त्याच्या मित्रानी एका मेजवानीचा बेत केला होता. त्या मेजवानीचें शॉयलॉकलाहि निमंत्रण होते. तो मारे ऐटीत म्हणे, " मी ख्रिश्चनाबरोबर जेवणार नाही. " पण निमन्त्रण येताच स्वारी जेवावयास निघाली...' ख्रिश्चन लोकाना तेवढेच अधिक बुडवावयास मिळेल ' हा त्याचा विचार !

" भोजनावर असा हात मारतो की, यॅव्र ! या ख्रिश्चनाना असेंच लुटले पाहिजे. " असे फुशारकीचे उद्गार काढून व आपले घर आपल्या मुलीवर सोपवून, स्वारी खुषीत जेवायला निघाली होती.

स्वतःच्या मुलीशिवाय तो आपले घर दुसऱ्या कोणावर सोपविणार ? त्याच्या नात्याचें असें तेच एक माणूस ! आणि नोकर ? लॅन्सेलॉट हा एक नोकर होता पण तो केव्हाच नोकरी सोडून गेलेला. " हा समंध आहे, "

असेंच लॅन्सेलॉट म्हणे. शॉयलॉकची नोकरी करणें त्याच्या सदसद्विवेकबुद्धीला पटत नव्हतें. म्हणूनच शॉयलॉकची नोकरी सोडून तो बॅसानिओकडे गेला होता.

जसा नोकराला तसाच मुलीलाहि शॉयलॉकबद्दल तीव्र तिरस्कार वाटे. 'अशा बापाची मुलगी होणं ही किती लाजिरवाणी गोष्ट आहे! आमचं घर म्हणजे नरक आहे नरक!!' असें ती मनातल्या मनात म्हणे. तिचा स्वभाव शॉयलॉकसारखा स्वार्थी, दुष्ट व क्रूर नव्हता. ती शहाणी होती, सुंदर होती आणि प्रामाणिक होती. तिच्या या गुणावर लोरेंझो हा ख्रिश्चन तरुण भाळला होता. तो म्हणे, "हिच्या बापाला पुढें स्वर्गांत प्रवेश मिळाला, तर तो या मुलीच्या सद्गुणामुळेंच मिळेल कदाचित्!"

त्या दोघांचें प्रेम तर जमलें, पण लग्न कसें जमणार? शॉयलॉक हा कर्मठ ज्यू. ख्रिश्चनांचा कट्टा द्वेष्टा. तो या दोघांच्या लग्नाला संमति देणार कशी? मोठीच धोंड होती ही. पण प्रेमिकांना धोंडच काय, पण डोंगरहि लीलेनें ओलांडता येतात आणि सागरहि तरून जाता येतात. त्या दोघांनीं ठरविलें कीं, आपण गुपचुप पळून जावयाचें आणि दूर कुठें तरी लग्न उरकून घ्यावयाचें.

प्रेमिकांच्या या कटाला आता नामी संधि चालून आली. शॉयलॉक बॅसानिओच्या निरोप-समारंभाला गेलेला. साऱ्या घरात एकटी जेसिका. आणि वेळ मध्यरात्रीची. वाः! याहून अधिक काय पाहिजे?

जेसिकानें घरातील दागदागिने, जडजवाहिर, पैसाअडका सारें कांहीं पेटींत भरून घेतलें. स्वतः पुरुषाचा वेष धारण केला. आणि रात्रीच्या काळोखात, आंधळ्या प्रेमाच्या मार्गदर्शनानें, वडिलांची सारी दौलत सांगातीं घेऊन, जेसिका आपल्या प्रियकराबरोबर पळून गेली. तिचा शोध करण्यासाठीच शॉयलॉक धावाधाव करीत बंदरापाशीं येऊन थडकला. पण तो तेथें पोंचण्यापूर्वीच बंदरावरील जहाज निघालें होतें अन् त्यांतून बॅसानिओनें प्रयाण केलें होतें. बेल्मॉंटकडे—आपल्या प्राणप्रिय पोर्शियाकडे—आपल्या जीवितांचें स्वप्न साकार करण्यासाठीं!

बॅसानिओच्या आगमनाची वर्दी कानीं पडताच पोर्शियाची कळी खुलली; परंतु त्याबरोबरच तिला चिंताहि वाटूं लागली. बॅसानिओसारखा हुशार व पराक्रमी तरुण आपल्याला पति म्हणून लाभावा ही तिची लालसा. ती पूर्ण

होण्याचा क्षण आता जवळ आला, म्हणून तिला केवढा हर्ष झाला! तिचें मन जणुं हवेवर तरगूं लागलें.

पण त्याबरोबरच तिला अशी चिताहि वाटूं लागली कीं, बॅसानिओनें चुकून भलतीच पेटी उघडली, तर आपले सारे स्वप्न धुळीस मिळेल. तसें होऊ नये म्हणून ती मनातल्या मनात ईश्वराची प्रार्थना करीत होती. तो निर्णयाचा क्षण जवळ येऊं नये असेंच ती म्हणत होती. तो क्षण लाबणीवर टाकण्याचाच ती प्रयत्न करीत होती. वास्तविक बॅसानिओ योग्य तीच पेटी उघडील, तीत त्याला आपली प्रतिमा दिसेल आणि मग आपण त्याच्या गळयात विवाहमाला घालूं अशा कल्पनेचें सुख—किंवा सुखाचें स्वप्न—ती अनुभवीत होती. पण म्हणतात ना, 'मन चिंती ते वैरी न चिंती!' वाईटच होईल असा अदाज करण्याची खोड मनाला असते. त्यांतहि आपल्या अति स्नेहाचा जिवलग असला म्हणजे तर त्याला अनिष्टाचीच शका येते. आणि स्वतःविषयी तर बोलावयासच नको. प्रतिकूल तेंच घडणार अशी कुशका मनाला सारखी भेडसावीत असते. अशा द्विधा अवस्थेंत असल्याने पोर्शिया बॅसानिओला म्हणूं लागली,

"थाबा, अंमळ थाबा, एकदोन दिवस तरी थाबा हो. मग आपण आपल्या नशिबाची परीक्षा पहा. पेटी उघडण्याचं साहस इतक्यात करूं नका. कारण भलतीच पेटी उघडली गेली, तर मला आपल्या सगतीला मुकावं लागेल."

अशा प्रेमाचे उद्गार तिनें आतापर्यंत कोणाबद्दलच काढले नव्हते. पण बॅसानिओबद्दल तिच्या हृदयात निराळीच भावना खेळत होती. ते प्रेम होते असे ती मानीत नव्हती. पण ती अनुकूल संवदेना होती हे खरे. त्या सवेदनेचे नाव काय? स्वरूप काय? याची तिला काहीच कल्पना नव्हती. कुमारिकेला तशी कल्पना असणार तरी कशी? अन् तिच्या भावना शब्दानी व्यक्त होणार कशा? भावना मूक असते ती पर्यायाने पुनः पुनः एवढेंच म्हणत होती,

"बॅसानिओ, तुम्ही थाबा, आणखी एकदोन महिने थाबा. पेटीच्या जुगारात फासे टाकण्याची घाई करू नका. पेटी अचूक कशी शोधून काढावी हें मी तुम्हाला सागूं शकेन. पण नाही—ते मी सागू शकत नाही! कारण तें न सागण्याची शपथ मी घेतलेली आहे. पण मी ते न सागितलं अन् त्यामुळ

तुमची परीक्षा चुकली तर ? माझी केवढी हानि होईल. तुमच्या नजरेनं माझ्या हृदयाचे दोन तुकडे केले आहेत. एक तुकडा तुमचेपाशीं आहे. तो दुरावला तर मी जगूं कशी ? मी मनानं तुमची आहें. पण विवाहानं तुमची नाहीं झालें तर ? हें सारं ऐश्वर्य घेऊन मला काय करायचं आहे मग ?

पोर्शियानें आपली प्रणयभावना प्राजळपणें व्यक्त केली. तिनें आपल्या हृदयाची व्यथा बॅसानिओपुढें मांडली. पण त्याला परत जाण्याची घाई होती. त्याच्या मित्राचा गळा सावकारी पाशात गुंतलेला होता. त्याचें काळीज व्हेनिसकडे खेचलें जात होतें. म्हणून तो तिला म्हणाला,

" माझं मन कात्रींत सापडलं आहे. मला व्हेनिसची ओढ लागली आहे."

तें ऐकून पोर्शिया चपापली. तिनें त्याला त्वेषानें विचारलें, " तुमच्या प्रेमात प्रतारणा आहे का ? असेल तर तसं उघड सांगा."

" छे छे, प्रिये, भलती शंका घेऊं नकोस. बर्फ व अग्नि यांचं जसं सख्य असणार नाहीं, तसंच माझं प्रेम व प्रतारणा हीं एकत्र नांदणार नाहींत."

बॅसानिओच्या या उत्तरानें पोर्शियाचें मन शांत झालें, प्रसन्न झालें, आशेनें तरारलें. आपल्यावर मनापासून संपूर्ण प्रेम करणारा हा प्रियकर आपल्याला लाभावा अशी लालसा तिच्या चित्तांत बळावली. पण पुनः तिला पेटीची शंका आली. म्हणून ती त्याला म्हणाली, " सुंदर ! फारच सुंदर ! आतां फक्त एकच व्हायचं राहिलं आहे. पेटी अचूक उघडायचं काम तेवढं राहिलं आहे. तें आपण करावं."

आपली आशा पूर्ण होणार या कल्पनेतच पोर्शियाचें मन पुरें रंगून गेलें. आणि त्याबरोबरच बॅसानिओ आपलें भाग्य उघडण्यासाठीं पुढें सरसावला.

सोन्याची, चांदीची, शिशाची—त्या तीन पेट्या त्याला दिसूं लागल्या. त्या आपल्याला हांक मारीत आहेत असें त्याला वाटूं लागलें. पण तो बाह्य रूपाला भुलणारा नव्हता.

शुक्ति नलगे मज हवें खरें मोतीं । रूप नलगे मज हवी तुझी प्रीति ।
पात्र सोन्याचें असो मृत्तिकेचें । वेड मजला आंतल्या अमृताचें ॥

हीच त्याची वृत्ति ! सोन्याची पेटी कितीहि चकाकत असली तरी तो तिच्यावर भाळला नाही. कोणत्या पेटीच्या पोटात आपल्याला हवें असलेलें 'अमृत' आहे, याचाच तो विचार करूं लागला. त्याच्या मनात आलें,

'कायद्यामध्यें खोट्यावर खऱ्याचा मुलामा चढविला जातो. धर्मामध्ये पापाचे समर्थन धर्मग्रंथाच्या आधारे केले जाते. आणि व्यवहारात सशासारखी भित्री माणसें शक्तिदेवाचे अवतार म्हणून, शूर गणली जातात. कैक स्त्रियाचें सौंदर्यहि असेच नकली, कृत्रिम व बाह्य साधनानी सजविलेले असते. एकीच्या मस्तकावरील केशकलाप दुसऱ्या ललनेचें शिरोभूषण होऊन बसलेला असतो; अलंकार फसवे असतात. आणि नुसत्या सोन्याचे तरी महत्त्व काय? हात लावला की सोनें बनविणाऱ्या मिडास राजाची दशा काय झाली? त्याच्या हस्तस्पर्शाने त्याच्या अन्नाचे रूपातर सोन्यात झाले. पण उपयोग काय? त्याला अन्न खाता येईना व त्याचें पोट भरेना. माणूस का केवळ सोन्यावर जगतो?'

अशा विचाराची चक्रे बॅसानिओच्या मनात फिरूं लागली आणि म्हणून त्याने सोन्याच्या पेटीला रामराम ठोकला.

तसाच त्याने चादीच्या पेटीचाहि निरोप घेतला. 'चादीची नाणी माणसा-माणसाच्या व्यवहारात कितीहि महत्त्वाची असली, तरी त्याची काय किमत? त्यापेक्षा गरीब बिचारे शिसेच बरे.'– असा विचार बॅसानिओने केला. आणि अखेर तो त्या शिशाच्या पेटीकडे एक एक पाऊल टाकीत चालू लागला.

बॅसानिओचें एकेक पाऊल त्या यशोदायी मंजूषेकडे पडत चाललेले पाहून पोर्शियाला वाटूं लागले, आपलेच एकेक पाऊल प्रेमाच्या साम्राज्यात पडत आहे, आनदाच्या नंदनवनात पडत आहे. आपल्या जीविताचे साफल्य होण्याचा मंगल मुहूर्त सन्निध आला, या भावनेने तिचे मन मोहरून गेले, शरीर रोमाचित झाले.

आतापर्यंत अनेक युवकानी सोन्याचादीच्या त्या दोन पेट्या उघडल्या होत्या आणि त्याना अपयश आले होते, हे तिनें पाहिले होते. म्हणून तिसऱ्या शिशाच्या पेटीकडे बॅसानिओची पावले वळलेली पहाताच तिला धन्य धन्य वाटूं लागले. तिच्या मनातील निराशेचा अंधार पार पळाला. भीति आणि मत्सर कोठल्याकोठे गेले. इतर साऱ्या कल्पना, भावना, संवेदना, केव्हाच विरून गेल्या.

प्रेमाची–केवळ एका प्रेमाची–भावनाच तिच्या अंत:करणांत खेळूं लागली. आनंदाचा पूर तिच्या चित्तात लोटला.

आणि तिकडे बॅसानिओ धिमीं पावलें टाकीत त्या शिशाच्या पेटीजवळ जाऊन पोहोंचला. धडधडत्या अंत:करणानें त्यानें किल्ली पेटीला लावली. आणि थरथरत्या हातानें त्या पेटीचें दार हल्के हल्के वर उचललें.



एक सेकंदच! पण तो साऱ्या आयुष्याचा निर्णय लावणारा! आपले आयुष्य सौख्याच्या शिखरावर जाऊन पोहोंचणार की दुःखाच्या दरीत आपटून त्याचा चक्काचूर होणार याचा निर्णय लावणारा तो क्षण! आपली जिज्ञासा, उत्सुकता, उत्कंठा, सारी डोळ्यात एकवटून तो त्या पेटीत पाहूं लागला. आपले नशिबच जणू तो आत पाहू लागला. आणि—

"हे काय? हे काय? हे तर पोर्शियाचं छायाचित्र!" असे म्हणून तो आनंदाने नाचू लागला. त्या चित्रातील डोळे आपल्याशी बोलत आहेत, असे त्याला वाटू लागले. त्या चित्रातील ओठातून मधुर वाणी निघत आहे असे त्याला ऐकूं येऊं लागले. त्या चित्रातील सोनेरी कुंतल म्हणजे पुरुषाची हृदयें पकडण्याची जाळीच आहेत, असें त्याला भासूं लागले. त्याची दृष्टि त्या चित्रात गुंतली—त्याची वृत्ति त्या चित्रात गुंगली. पण लगेच भानावर येऊन त्याचें मन म्हणाले,

'काय मी वेडा! वस्तु सोडून छायेकडेच पहात बसलों. या चित्राकडे लक्ष देऊन मी पोर्शियाकडे दुर्लक्ष केलं. छे, असं होता कामा नये. आधीं या पेटीतील लेख वाचला पाहिजे.' असे म्हणून त्याने लेख वाचायला सुरुवात केली. त्या लेखात लिहिले होते :

"तू बाह्य रूपाला भुलला नाहींस, तर सत्याकडेच आकर्षित झालास;
त्यामुळे तुला हें यश, हे भाग्य लाभले आहे. त्याने तूं तृप्त हो.
अधिकाची आशा धरूं नकोस."

बॅसानिओ आनंदाने वेडा झाला. तो चटदिशी पोर्शियाकडे गेला. त्याने जुगार जिंकला होता. त्याच्या जीवनाचे स्वप्न साकार झाले होते. आपण पहातों हे सत्य की स्वप्न हेच त्याला कळेना. म्हणून तो पोर्शियाला म्हणाला, "प्राणप्रिये, मी जागा आहे की झोंपेत आहे? या प्रेमयुद्धात मला खरो-खरच विजय मिळाला ना? तूं त्या विजयावर आपलं शिक्कामोर्तब केलंस म्हणजेच मला खरं वाटेल."

हे अमृतमधुर शब्द ऐकून पोर्शियाला वाटले, स्वर्गच खाली उतरला! तिचा प्रियकर तिला लाभला, आणखी काय हवे होते? तिला कमी काहीच नव्हते. ऐश्वर्यात तर ती लोळत होती. फक्त आपल्या मनासारखा पति तिला हवा होता. आणि तो आता मिळाला होता. आपल्या वडिलांनी लावलेला पण

जिकून बॅसानिओ आपला जन्माचा सहचर झाला, हे कळल्यामुळे तीहि आनंदाने बेभान झाली. पण या कुमारिकेची लज्जा तिच्या आनंदसागराला 'वेला' म्हणून शोभत होती. मोठ्या संतोषानें पण नम्रतेनं ती बॅसानिओला म्हणाली,

"महाराज, ही मी अशी आहे. मी माझ्या परिस्थितीवर पूर्ण संतुष्ट आहें. पण आपल्यासाठी, हो, आपल्यासाठीं—मला वाटत, मी सहस्रपट सुंदर असावयास हवी होतें, लक्षपट श्रीमंत असावयास हवी होते, म्हणजे मी तुमच्या पसंतीस उतरलें असते. माझं सौंदर्य, माझे सद्गुण, माझं वैभव, माझे आप्तेष्ट हें सारं सार आपल्या अपेक्षापेक्षाहि अधिक असावयास हव असं मला वाटतं. त्यासाठीं मी काय करूं? मी आहें ही अशी आहे. प्रियकरा, मी ही एक भोळीभावडी, अशिक्षित अननुभवी मुलगी आहें. पण त्यांत सुख इतकंच कीं, अधिक शिकूंच नये असं वाटण्याइतकी ती वाढलेली नाहीं शिकताच येऊं नये इतकी ती मंदहि नाहीं. आपल्या कोमल मनाकडून धडे घेण्यास ती मुलगी सादर आहे. आपण खरोखर माझे स्वामी आहात, गुरु आहांत, राजे आहात. मी स्वतःला माझ्या सर्वस्वासह आपल्याला अर्पण करीत आहे. जे जे म्हणून माझे आहे तें तें आता आपलं झाल आहे. हा सुंदर महाल, हे चाकरनोकर आणि मी स्वतः या सर्वांची मालकीण या क्षणापर्यंत मी होते. पण या क्षणापासून आपण या सर्व ऐश्वर्याचे धनी झाला आहात, माझे स्वामी बनला आहात. याची खूण म्हणून मी आपल्या बोटात ही अंगटी घालते."

मग पोर्शियाने एक मौल्यवान अंगठी मोठ्या प्रेमभावाने बॅसानिओच्या बोटात घातली. आणि मिस्किलपणाने तिने त्याला बजावले, "ही अंगठी गमवावयाची नाहींहो. ती जर हरवलीत किंवा दुसऱ्या कोणाला दिलीत तर आपल्या प्रेमाचा अंतच झाला म्हणून समजा. मग मात्र तुम्हाला माझ्या निंदेला पात्र व्हाव लागेल. काहींहि झाल तरी ही माझ्या प्रेमाची खूण आपण कधींहि दूर सारू नका."

बॅसानिओला अस्मान ठेंगणें झाले. "स्वर्ग घेरला। चुंबायाला। खाली लवला। मजला गमला॥" असे त्याला वाटूं लागलें. आज सोन्याचा दिवस उगवला, असा भास त्याला झाला तो म्हणाला, "प्रिये, यावर मी काय बोलणार? माझी सारी वाचाशक्तिच तूं हिरावून घेतली आहेस. मा.

अंतःकरणच तुझ्या अंतःकरणाशी बोलत आहे. माझ्या नसानसातून वहाणार रक्त प्रेमाच्या तालावर नृत्य करीत आहे. माझ्या सर्वांगात तृप्ति भरून राहिली आहे. आणि हर्षाशिवाय दुसरी भावनाच माझ्या मनात आता खेळत नाही. तूं दिलेली ही प्रेमाची अगठी माझ्या बोटापासून दूर कशी होईल ? अगठी माझ्यापासून जाणं म्हणजे माझ्या शरीरातून प्राणच जाणं आहे. तस कदापि होणार नाहीं. आपलं प्रेम शुद्ध आहे, मंगल आहे अन् अभंग पण आहे. ’

आपल्या स्वामिनीच्या प्रेमाचें सार्थक्य झालेले पाहून नेरिसालाहि अत्यानद झाला. तिच्या त्या आनंदात भर टाकणारी एक घटना त्याचवेळीं घडली होती. ती म्हणजे बॅसानिओचा एक मित्र ग्रॅशिआनो हा तेथें आलेला होता, त्याचे सूत नेरिसाशी जमलें होते. म्हणून त्यानें प्रेमाच्या या वहात्या गंगेत हात धुवून घेण्याचें ठरविले. तो बॅसानिओला म्हणाला,

“ मित्रा, तुझं लक्ष स्वामिनीकडे होतं, तर माझं तिच्या दासीकडे होतं. तूं प्रेमात पडलास, मीहि प्रेमात सापडलों. तुझं दैव त्या पेटीवर अवलंबून होतं तसं माझं नशीब तुझ्यावर विसबून होतं. तूं यशस्वी झालास, आता मला यशस्वी कर, म्हणजे आपणा सर्वांच्या आनंदाचा पेला काठोकाठ भरून वाहूं लागेल. ”

“ खरं का हे ? ” पोर्शियानें चटकन् नेरिसाला विचारले आणि तिने होकार देताच त्या दोघाचे लग्न ठरले. आता उणीव कसली ती राहिलीच नाही. सर्व आनंदीआनंदच ! सौख्याची पौर्णिमाच फुलली !

पण चंद्र म्हटला कीं कलंक आलाच ! ग्रहणहि लागावयाचे त्याला कधीं कधी. सुखानंतर दुःख हा चक्रनेमिक्रम नित्य चालू. सुखाचा फेरा पुरा होतो न होतो तोच बॅसानिओच्याहि दुःखाचा फेरा सुरू झालेला दिसला.

व्हेनिसहून निघालेली लोरेन्झो व जेसिका आपल्या एका मित्रासह वेलमॉटला आली व पोर्शियाच्या वाड्यात येऊन दाखल झाली. त्यावेळीं तेथील सारीं माणसें आनदाच्या शिखरावर विहार करीत होती. या नव्या पाहुण्यानी बॅसानिओला एक लखोटा दिला. त्यात ॲन्टोनिओचे पत्र होते.

ते पत्र बॅसानिओने फोडले, आणि तो ते काळजीने वाचूं लागला. ते पत्र वाचता वाचता त्याच्या मुद्रेवर चिंतेची छाया पसरू लागली. ती पाहून पोर्शिया तर्क करूं लागली, “याचा कोणी प्रिय मित्र तर मृत्यु पावला नसेल. नाही तर दुसऱ्या कशाने त्याच्या समतोल चित्ताची इतकी चलबिचल झाली असती ?

पण छे, त्याची मुद्रा अधिकाधिकच काळवंडूं लागली. मृत्युपेक्षाहि अधिक भयंकर या जगात काय असूं शकेल ?"

तिला कांहींच कल्पना करता येईना, म्हणून बॅसानिओला आर्जवी स्वरात ती म्हणाली, "नाथ, आतां मी आपली अर्धांगी—आपल्या सुखदुःखाची भागीदारीण. मला नाही का सांगायच या पत्रात काय आहे तें ?"

बॅसानिओ काय बोलणार ? त्याच्या डोळयापुढे कृतान्त उभा होता काळ-पुरुष आपल्या जिवलग मित्राचे प्राण घेऊन चालला आहे, असे भयकर दृश्य त्याच्या डोळयापुढें दिसूं लागलें होतें. त्याच्या हृदयाचा थरकाप उडाला होता. त्याच्या तोंडून एवढेच शब्द बाहेर पडले,

"काय सांगूं ? पोर्शिया, तुला काय सांगूं ? आतापर्यंत कागदावर कोणी कधींच लिहिले नसतील, असे भीषण शब्द या पत्रात आहेत. हें पत्र म्हणजे मला माझ्या मित्राचं शरीर वाटतं अन् त्या पत्रातील प्रत्येक शब्द म्हणजे त्याच्या शरीरातील रक्त वहाणारी एकेक जखम वाटते."

व्हेनिसहून आलेल्या पाहुण्यानीं अशी दुष्ट बातमी सांगितली कीं, देशो-देशीं गेलेलीं ॲन्टोनिओचीं सारीं जहाजें समुद्रात बुडालीं आणि शॉयलॉकचें कर्ज देण्याची त्याची मुदतहि टळली. आणि शॉयलॉक काय ? त्याची मुलगी जेसिकाच सांगूं लागली,

"मी घरीं होतें, तेव्हाच माझ्या वडिलांच्या तोंडून हे ऐकलं आहे कीं, 'मला ॲन्टोनिओचे मासच पाहिजे. माझ्या कर्जाच्या वीसपट रक्कम जरी मला कोणी दिली तरी नको.'"

तरी पोर्शिया म्हणाली, "असे कसे होईल ? आपण त्याला तीन हजारा-ऐवजीं सहा हजार देऊ, बारा हजार देऊ, अठरा हजार देऊं. पण आपल्या जिवलग मित्राच्या केसाला धक्का लागूं देणार नाहीं. चला, आतां त्वरा करा, आपण प्रार्थनामंदिरात जाऊं आणि विवाहविधि पार पाडूं कीं लगेच तुम्ही व्हेनिसचा रस्ता धरा. आपल मन अस्वस्थ असताना आपण इथं रहा असं कस मी म्हणूं ? मी आपल्याला हवं तितकं सोनं देतें तें घ्या अन् तें क्षुद्र कर्ज फेडा. मग तुमच्या त्या जिवलग मित्राला इथं घेऊन या. पण त्या मित्राचं तें पत्र तर मला एकदा वाचून दाखवा."

पोर्शियाच्या या धीराच्या व प्रेमाच्या बोलण्यानें बॅसानिओ संतुष्ट झाला व तो ते पत्र वाचू लागला :

" प्रिय मित्रा,

माझीं सारी जहाजे परागदा झाली आहेत. माझे सावकार कठोर बनले आहेत. शॉयलॉकशी केलेला करार मोडला आहे. कारण त्याची मुदत टळली आहे. त्याची शिक्षा म्हणून मी मृत्यु पत्करणार आहे. या मृत्युसमयी, मित्रा तुझी भेट झाली तर मला फार आनंद वाटेल. तुझ्या इच्छेस येईल तसें कर. माझ्या पत्रामुळे नव्हे, पण तुझ्या प्रेमामुळे तुला इकडे यावेसे वाटले तर ये. "

बस्स ! एवढेंच पत्र. पण त्यामध्यें किती त्याग, किती प्रेम, किती जिव्हाळा ओथंबलेला ! त्याने पोर्शियाच्या हृदयाचा ठावच घेतला. अन् तिने बॅसानिओला त्वरेने व्हेनिसकडे निघण्याची सूचना दिली. जाताना बॅसानिओ म्हणाला, " प्रिये, मी जितक्या त्वरेनं जातो तितक्याच त्वरेनें परत येईन ही खात्री बाळग. "

प्रार्थनामंदिरात जाऊन पोर्शिया व बॅसानिओ ही दोघी विवाहबद्ध झाली. आणि बॅसानिओने लगेच व्हेनिसकडे कूच केले. आपल्यासाठी आपल्या मित्राचे प्राण धोक्यात आहेत, हे कळल्यावर स्वस्थ कोण राहील ? त्याच्याइतकीच पोर्शियाच्या मनाचीहि चलबिचल उडाली होती. आपल्या पतीचे चित्त थाऱ्यावर नसताना कोणा स्त्रीला स्वस्थ बसवेल ? काहींहि करून, आपल्या पतीच्या परममित्राची मुक्तता मृत्यूच्या मगरमिठींतूनहि आपण केलीच पाहिजे, असे तिला वाटू लागले. पण ती करणार काय ? तिने कर्जफेडीसाठीं हवी तितकी रक्कम देण्याचे कबूल केले होतेच. याहून अधिक ती काय करू शकणार ?

' का नाही करूं शकणार ? मी स्त्री असले म्हणून काय झालं ? स्त्रियानी काय पुरुषापेक्षा कमी चातुर्य दाखविलं आहे ? कमी शौर्य गाजविलं आहे ? ' असे महत्त्वाकांक्षी विचार तिच्या मनात उसळ्या मारू लागले. या बाक्या प्रसंगात आपल्या पतीला साहाय्य करण्यासाठीं आपण काही तरी विशेष कर्तृत्व करून दाखविले पाहिजे असे तिच्या मनाने घेतले. ती मोठी बुद्धिमान् होती आणि धाडसी पण होती. तिने तत्काळ एक योजना मनात आखली.

'बरं ! आपणहि येथून व्हेनिसला प्रयाण करायचं; पण तिथं नुसतं जाऊन आपण काय करणार? आपण ॲन्टोनिओला प्राणसंकटातून कसं सोडविणार? नुसता पैसा काय कामाचा? जसा शत्रु असेल तशीच शस्त्रं आपण वापरली तरच आपला जय होणार.'

विचार करता करता तिला असे सुचलं कीं, पॅडुआ या शहरी एक प्रख्यात कायदेपंडित आहे. त्याचा लौकिक फार मोठा होता. तो आपल्या बुद्धि-चातुर्याने या कोर्टातून काहीं तरी मार्ग काढील अशी आशा पोर्शियाला वाटूं लागली. म्हणून तिने आपला एक सेवक तातडीने पॅडुआ गावाकडे पाठविला. अन् तेथील आपल्या एका नातलगाला एक पत्र दिलें. तिने आपल्या सेवकाला भराभर सूचना दिल्या:

"हे पहा, तूं वाऱ्याच्या वेगाने जा आणि मनाच्या वेगाने परत ये. उगाच वायफळ बोलण्यात वेळ घालवूं नकोस. ते देतील तीं टिपणें व कपडे घेऊन तूं तसाच तडक जहाजापाशी ये. तिथें मी जाऊन पोहोचण्यापूर्वी तूं परत आला पाहिजेस. एक सेकंदहि वाया घालवूं नकोस. जा, जा. फार आणीबाणीचा प्रसंग आहे बघ."

सेवक पोर्शियाचे पत्र घेऊन निघाला. नंतर पोर्शियाने जेसिका व लोरेंझो या दोघांच्या हवाली आपलें घर केलें. पण आपण व्हेनिसला जाणार याची दाद मात्र तिने त्यांना लागूं दिली नाहीं. आपल्या गुप्त बेताची वाच्यता होऊं न देण्याचें तिनें ठरविलें होतें. ती जेसिकाला म्हणाली,

"माझ्याऐवजी तू आहेस आणि बॅसानिओच्या जागी लोरेन्झो आहेत, असें समजून तुम्ही दोघांनीं घराची सारी व्यवस्था काळजीपूर्वक पहा. देवा-समोर मी अशी प्रतिज्ञा केली आहे कीं, माझा पति परत येईपर्यंत मी ध्यान-धारणा व प्रार्थना करीत काळ कंठीत राहीन. त्यासाठी येथून दोन मैलावरील एका मठांत मी जाणार आहे. तिथं फक्त नेरिसा माझ्यासोबत राहील."

ही सारी योजना अर्थातच जेसिका व लोरेंझो यांनी मान्य केली व घराच्या देखरेखीची जबाबदारी आपल्या शिरावर घेतली.

आपल्या मालकिणीची योजना ऐकून नेरिसा बुचकळ्यात पडली. तिनें विचारलें, "बाईसाहेब, हें काय आहे सारं? मठ काय? प्रार्थना काय? अन् ध्यानधारणा काय?"

" अग, ती युक्ती आहे. तो केवळ बुरखा आहे. खरी योजना मी दुसरीच आखली आहे. पण ती कोणाला कळू नये म्हणून मठात जाऊन रहाण्याचं हे सोंग मी केलं आहे. "

" मग आपली खरी योजना तरी कोणती ? "

" थेट व्हेनिसला जाण्याची. "

" व्हेनिसला ? अन् तिथं जाऊन आपण काय करणार ? आपल्यासारख्या स्त्रियाना त्या कोर्टाच्या कामात काय करता येणार ? "

" काय करता येणार ? पहाशीलच तूं आता. मात्र तूं मला मनापासून मदत केली पाहिजेस. "

" हो हो, तुम्ही म्हणाल ते करीन. वेळ आली तर प्राणहि देईन. "

" नको, नको, प्राण नको देऊंस; पण माझ्याबरोबर व्हेनिसला मात्र चल. अन् तेहि पुरुषवेषात. तूं आणि मी पुरुषाचे वेष धारण करून तिकडे जाऊं. "

" काय पुरुषवेषात ? मोठी गंमतच आहे म्हणायची. अन् ते कशासाठीं ? बाईसाहेब, मला तर यातलं काहीच कळत नाही. "

" कळेल–हळू हळू सार काही कळेल. आत्ता एवढंच लक्षात ठेव कीं, पुरुषाच्या रुबाबदार वेषात आपण येथून बाहेर पडायच. आपली नेहमीची गजगति टाकून मर्दानी पद्धतीनं पावल टाकायची; आणि बोलताना आवाजहि मोठा काढायचा. "

पोर्शियाच्या डोळ्यापुढे आपली स्वतःची पुरुषाकृति दिसूं लागली. पुरुषी पोशाख, पुरुषी आवाज, पुरुषी रुबाब एवढेच नव्हे तर, पुरुषी विचारहि तिच्या डोक्यात खेळूं लागले ती ते नेरिसाला समजावून सांगूं लागली.

" पण अस वागून पुढं करायच काय बाई ? " नेरिसाने मुद्द्यालाच हात घातला.

" ते सारं काही मी गाडीत बसल्यावर तुला सांगेन. बागेच्या दाराशी गाडी उभी आहे. तेव्हा चल, चल, घाई कर. एका दिवसात वीस मैल अंतर तरी आपल्याला तोडायचं आहे. वायुवेगानं मनोवेगानं, आपण तिथं जाऊन पोहोंचल पाहिजे. तिथं पोहोंचल्यावर मग तूं पहा माझी करामत ! "



## ★ न्याय मिळाला! : ४

साऱ्या व्हेनिस शहरात एकच खळबळ ! ज्याच्या त्याच्या तोंडी एकच विषय ! बाजारात जा, कचेरीत जा, सर्वत्र एकच चर्चा ! वगैरे हाच प्रश्न — “ या खटल्याचा निकाल काय होणार ? ”

मुदत टळली, कर्जाची रक्कम परत आली नाही, तेव्हा शायलॉकनं, कर-नाम्याच्या आधारें, ॲन्टोनिओवर तत्काळ फिर्याद गुदरली. ॲन्टोनिओ हा एवढा मातबर व प्रतिष्ठित व्यापारी, पण त्याला कर्जापायीं एखाद्या [illegible] भिकाऱ्याप्रमाणें, कच्च्या कैदेंत डांबून ठेवण्यास शायलॉक कचरला नाही.

आज या विलक्षण खटल्याची सुनावणी होणार, म्हणून न्यायमंदिरात ना-रिकांची व व्यापाऱ्यांची कोण गर्दी उडाली होती. ॲन्टोनिओसारखा [illegible] धनिक पिंजऱ्यात सापडला म्हणून सर्वसामान्य स्त्रीपुरुषांनाहि मोठं [illegible]

त्यांतहि, केवळ आपल्या मित्राची गरज भागविण्यासाठीं त्याने आपला गळा गुंतविला म्हणून सर्वांना त्याच्याबद्दल आदर ! सर्वांत लक्ष वेधून घेण्यासारखी गोष्ट म्हणजे, शॉयलॉकचा लोकविलक्षण करारनामा ! पौंडभर मांस काढून घेण्याची त्यातील ती अभूतपूर्व व अमानुष अट, सारीच नवलाई !

एकाएकीं न्यायालयात स्तब्धता पसरली. ड्यूकची स्वारी येऊन न्यायासनावर अधिष्ठित झाली. सरकारी अधिकाऱ्यांचा परिवार आजुबाजूस बसला, वकील मंडळी येऊन ऐटीनें स्थानपन्न झाली आणि सर्वत्र नजर फेकूं लागली. सर्वांची उत्कंठा शिगेस पोहोचली होती. पोलिसांनीं ॲन्टोनिओला न्यायालयांत आणलें तेव्हा सर्वांच्या नजरा त्याच्याकडे वळल्या होत्या व त्या सहानुभूतीनें ओतप्रोत होत्या.

न्यायासनावर बसलेल्या ड्यूकने विचारलें, "ॲन्टोनिओ येथें आहेत काय?"

"होय महाराज," ॲन्टोनिओने शांतपणें उत्तर दिले. त्याच्याकडे पाहून ड्यूकलाहि फार वाईट वाटले. हा महाभाग अशा आपत्तींत सापडावा याचें त्याला दु:ख वाटलें. त्याच्याकडे आदराने पहात न्यायमूर्ति ड्यूक म्हणाला, "मला आपल्याबद्दल फार वाईट वाटतें. आपल्याला ज्याच्याशीं सामना द्यावयाचा आहे तो प्रतिस्पर्धी निर्दय, अमानुष आणि पाषाणहृदयी आहे म्हणून तर विशेष वाईट वाटतें." ॲन्टोनिओची वृत्ति धीरोदात्त होती. आपल्या प्रतिस्पर्ध्याविषयींसुद्धा कटु शब्द उच्चारण्यास तो तयार नव्हता. त्यानें न्यायमूर्तींना उत्तर दिले, "महाराज, आपण माझ्या सावकाराचे कठोर मन मऊ करण्यासाठी फार कष्ट घेतल्याचे माझे कानीं आले आहे. पण त्य भूमिका अढळ आहे. कोणत्याहि कायदेशीर मार्गानें त्याच्या पाशातून

शॉयलॉक तरुणाच्या तर्फेने तेथे आला. तो येताच ड्यूक त्याला म्हणाला, "शॉयलॉक, अखेर तूं आपले प्रकरण या थराला आणून सोडलेस. अजून आशा वाटते कीं, तुझी निर्दयता वरपागी असेल आणि तुझी खरी दया आता प्रगट होईल. अन्टोनिओची जहाजें बुडाल्यानें त्याची केवढी भयंकर हानि झाली, याचा तूं सहृदयतेनें विचार कर. एवढ्या आर्थिक हानीनें कोणत्याहि सपन्न व्यापाऱ्याची कंबरच मोडून जावयाची. अशा स्थितींत त्याचेकडे सहानुभूतीनें कोण पहाणार नाहीं? अगदीं पोलादी मनाचा व पाषाणहृदयाचा रानटी माणूससुद्धा त्याचेवर दयाच दाखवील. मग तूंहि आपली पौंडभर मासाची अमानुष मागणी सोडून देशील ना?"

पण पाषाणावर पाणी ओतून काय उपयोग! ड्यूकच्या या सांगण्याचा परिणाम शॉयलॉकच्या पाषाणहृदयावर कांहींहि झाला नाहीं. उलट एक ख्रिश्चन न्यायाधीश आपलीं आर्जवें करीत आहे हे पाहून त्याचा हेकटपणा व ताठरपणा अधिकच वाढला. आणि तो निकरानें म्हणाला, "महाराज, मी काय करावयाचें योजलें आहे ते सारें आपल्या कानीं घातलेंच आहे. आता मुदत टळून गेली आहे. त्यामुळे करारनाम्यांतील अटीप्रमाणें, मला माझें येणें मिळालें पाहिजे. तें मी वसूल करीनच अशी शपथ मी माझ्या धर्मग्रंथावर हात ठेवून घेतली आहे, ती मी कशी मोडूं? आपण जर माझ्या हक्काचे देणें मला देण्याचें नाकाराल, तर आपल्या स्थानाला आणि आपल्या शहराच्या स्वातंत्र्याला तो कलंक ठरेल."

शॉयलॉकची ही ठाम भूमिका पाहून ड्यूकला फार खेद वाटला. या त्याच्या ठामपणामुळें खटल्याचा निकाल कसा शोककारक होणार याची अटकळ सर्वांना आली. तथापि आशा बलवत्तर असते. 'फिरून यत्न करून पहा' हे सूत्र ध्यानीं आणून न्यायमूर्ती त्याला म्हणाले, "शॉयलॉक, सर्व गोष्टी कायद्याप्रमाणेंच होतील. पण तूं मांसाचा तुकडाच का मागतोस? त्यापेक्षा ३००० डुकॅटची रक्कम कां मागत नाहींस?"

"तो माझ्या मर्जीचा प्रश्न आहे," शॉयलॉक गुर्मीनें उत्तरला "समजा, माझ्या घरात एक उंदीर धुडगूस घालीत आहे. त्याचा उच्छाद दूर करण्यासाठीं मी जर असे जाहीर केलें. 'या उंदराला जो कोणी पकडून बाहेर काढून फेकून देईल, त्याला मी १० हजार डुकॅट बक्षिस देईन' तर माझा

त्यातहि, केवळ आपल्या मित्राची गरज भागविण्यासाठी त्यानें आपला गळा गुंतविला म्हणून सर्वांना त्याच्याबद्दल आदर ! सर्वांत लक्ष वेधून घेण्यासारखी गोष्ट म्हणजे, शॉयलॉकचा लोकविलक्षण करारनामा ! पौंडभर मास काढून घेण्याची त्यातील ती अभूतपूर्व व अमानुष अट. सारीच नवलाई !

एकाएकी न्यायालयात स्तब्धता पसरली. ड्यूकची स्वारी येऊन न्यायासनावर अधिष्ठित झाली. सरकारी अधिकाऱ्याचा परिवार आजुबाजूस बसला. वकील मंडळी येऊन ऐटीने स्थानपन्न झाली आणि सर्वत्र नजर फेकूं लागली. सर्वांची उत्कंठा शिगेस पोहोचली होती. पोलिसांनीं अॅन्टोनिओला न्यायालयात आणले तेव्हा सर्वांच्या नजरा त्याच्याकडे वळल्या होत्या व त्या सहानुभूतीने ओतप्रोत होत्या.

न्यायासनावर बसलेल्या ड्यूकने विचारले, "अॅन्टोनिओ येथे आहेत काय ?"

"होय महाराज," अॅन्टोनिओने शांतपणे उत्तर दिले. त्याच्याकडे पाहून ड्यूकलाहि फार वाईट वाटले. हा महाभाग अशा आपत्तीत सापडावा याचे त्याला दुःख वाटले. त्याच्याकडे आदराने पहात न्यायमूर्ति ड्यूक म्हणाला, "मला आपल्याबद्दल फार वाईट वाटतें. आपल्याला ज्याच्याशीं सामना द्यावयाचा आहे तो प्रतिस्पर्धी निर्दय, अमानुष आणि पाषाणहृदयी आहे म्हणून तर विशेष वाईट वाटते." अॅन्टोनिओची वृत्ति धीरोदात्त होती. आपल्या प्रतिस्पर्ध्याविषयीसुद्धा कटु शब्द उच्चारण्यास तो तयार नव्हता. त्याने न्यायमूर्तींना उत्तर दिले, "महाराज, आपण माझ्या सावकाराचे कठोर मन मऊ करण्यासाठी फार कष्ट घेतल्याचे माझे कानी आले आहे. पण त्याची भूमिका अढळ आहे. कोणत्याहि कायदेशीर मार्गाने त्याच्या पाशातून माझी मुक्तता होणे कठीण आहे. त्याच्या क्रोधाशी मी अक्रोधाने वागणार आहे. तो माझ्यावर जो जो जुल्म करील, तो तो सारा मी शांत वृत्तीने सहन करीन. शांतिशिवाय दुसऱ्या कोणत्या शस्त्राने मी त्याच्याशी लढूं शकेन ?"

आपल्या प्राणावर उठलेल्या शॉयलॉकशी सुद्धा शांतीने, सहिष्णुतेनें वागण्याचा अॅन्टोनिओचा हा निर्धार ऐकून तेथे जमलेले सारे लोक तर चकीत झालेच; पण खुद्द न्यायमूर्तीहि त्याचे ते सात्विक तेज पाहून दिपले. ड्यूकनें शॉयलॉकला न्यायासनापुढें घेऊन येण्यास शिपायास फर्माविलें. अंगात लांब काळा झगा घातलेला व हनुवटीवर छोटीशी दाढी असलेला तो म्हातारा

शॉयलॉक तरुणाच्या तर्फेनें तेथें आला. तो येताच ड्यूक त्याला म्हणाला, " शॉयलॉक, अखेर तूं आपलें प्रकरण या थराला आणून सोडलेंस. अजून आशा वाटते कीं, तुझी निर्दयता वरवरची असेल आणि तुझी खरी दया आता प्रगट होईल. अन्टोनिओचीं जहाजें बुडाल्यानें त्याची केवढी भयंकर हानि झाली, याचा तूं सदयतेनें विचार कर. एवढ्या आर्थिक हानीनें कोणत्याहि संपन्न व्यापाऱ्याची कंबरच मोडून जावयाची. अशा स्थितींत त्याचेकडे सहानुभूतीनें कोण पहाणार नाहीं? अगदीं पोलादी मनाचा व पाषाणहृदयाचा रानटी माणूससुद्धा त्याचेवर दयाच दाखवील. मग तूंहि आपली पौंडभर मांसाची अमानुष मागणी सोडून देशील ना?"

पण पाषाणावर पाणी ओतून काय उपयोग! ड्यूकच्या या मागण्याचा परिणाम शॉयलॉकच्या पाषाणहृदयावर काहींहि झाला नाहीं. उलट एक ख्रिश्चन न्यायाधीश आपलीं आर्जवें करीत आहे हें पाहून त्याचा हेकटपणा व ताठरपणा अधिकच वाढला. आणि तो निकरानें म्हणाला, "महाराज, मी काय करावयाचें योजलें आहे तें सारें आपल्या कानीं घातलेंच आहे. आता मुदत टळून गेली आहे. त्यामुळें करारनाम्यातील अटीप्रमाणें, मला माझें येणं मिळालें पाहिजे. तें मी वसूल करीनच अशी शपथ मी माझ्या धर्मग्रंथावर हात ठेवून घेतली आहे, ती मी कशी मोडूं? आपण जर माझ्या हक्काचें देणें मला देण्याचें नाकाराल, तर आपल्या स्थानाला आणि आपल्या शहराच्या स्वातंत्र्याला तो कलंक ठरेल."

शॉयलॉकची ही ठाम भूमिका पाहून ड्यूकला फार खेद वाटला. या त्याच्या ठामपणामुळे खटल्याचा निकाल कसा शोककारक होणार याची अटकळ सर्वांना आली. तथापि आशा बलवत्तर असते. 'फिरून यत्न करून पहा' हें सूत्र ध्यानीं आणून न्यायमूर्ती त्याला म्हणाले, "शॉयलॉक, सर्व गोष्टी कायद्याप्रमाणेंच होतील. पण तूं मांसाचा तुकडाच का मागतोस? त्यापेक्षा ३००० डुकॅटची रक्कम का मागत नाहींस?"

"तो माझ्या मर्जीचा प्रश्न आहे," शॉयलॉक गुर्मीनें उत्तरला. "समजा, माझ्या घरात एक उंदीर धुडगूस घालीत आहे. त्याचा उच्छाद दूर करण्यासाठीं मी जर असें जाहीर केलें. 'या उंदराला जो कोणी/पकडून बाहेर काढून फेकून देईल, त्याला मी १० हजार डुकॅट बक्षिस देईन' तर माझा

हात कोण धरणार ? तो माझ्या मर्जीचा प्रश्न आहे. झाले समाधान आपले -या उत्तराने ? नसेल, तर मी निराळे उत्तरच देऊं इच्छित नाही. कोणाला कशाची, कोणाला कशाची आवड असते. तिला सयुक्तिक कारण काहीच नसते. तशीच ही माझी मर्जी आहे. मला या ॲन्टोनियाचा तिटकारा वाटतो—द्वेष वाटतो. आणि म्हणून मी याच्याशी असाच वागणार. समजले, मिळाले उत्तर ? "

" हे उत्तर नव्हे ! निष्टुर माणसा, हे उत्तर नव्हे ! हे तं आपल्या क्रौर्याचें समर्थन करीत आहेस. " बॅसानिओ ताडकन् उद्‌गारला. त्याला रहावेना. पण त्याच्या मताला शॉयलॉक काय किमत देणार !

" बॅसानिओ, माझ्या उत्तरानें तुझे समाधान करावे, म्हणून काही मी येथे आलेलो नाही, " शायलॉकनें त्याला तडकावले.

तेव्हा त्याची समजूत घालण्यासाठी बॅसानिओ आर्जवाने म्हणाला,

" अरे, एखाद्याविषयी आपल्याला प्रेम वाटत नसले, अगदी द्वेष वाटत असला, तरी त्याला ठार मारण्याचा विचार माणसे करतात काय ? "

पण पालथ्या घड्यावर पाणी ! शॉयलॉक कोणाचेंहि ऐकण्यास तयार नव्हता. त्याची आर्जवें ड्यूक व बॅसानिओ करीत आहेत हे ॲन्टोनिओला पहावेना; तो बॅसानिओला म्हणाला,

" बाबारे, कशाला खटाटोप करतोस ? ज्यू माणसाशी युक्तिवाद करणं आणि समुद्रकिनाऱ्यावर उभ राहून उसळत्या लाटेला ' थाब ! म्हणून सागणं दोन्ही सारखीच. कोकराचा फडशा पाडून शेळीला रडावयास लावणाऱ्या लाडग्याशी का कोणी हुज्जत घालतात ? आकाशात झंझावात सुटला असताना डोगरावरील झाडाची पानं फडफडत असतात, त्याना ' आवाज करूं नका ' असं सागण्यासारखंच ' ज्यू ' शी वाटाघाटी करणं आहे. ज्यूच्या अंतःकरणापेक्षा अधिक कठीण या जगात दुसर काही नाहीं. त्याला पाझर फोडण्यासाठी तूं का यातायात करतोस ? मला न्याय स वर मिळूं दे म्हणजे झाल. "

परंतु मित्राची माया बॅसानिओला स्वस्थ बसूं देईना. न्याय काय मिळणार हे उघड दिसत होते. कायदा शॉयलॉकच्या बाजूला होता. त्याच्या हातात करारनामा होता. त्या करारनाम्याप्रमाणे आपल्या मित्राचें मास कापले जाणार अशी धाकधूक बॅसनिओला वाटत होती. म्हणून तो शॉयलॉकला -

पुनःपुन्हां आर्जव करीत होता. "अरे, बाबा तुझ्या ३००० डुकॅटच्या ऐवजीं ६००० डुकॅट मी तुला देतों, ते का घेत नाहींस ?"

पण शॉयलॉक कसला ऐकतो ? त्याला पैसा नको होता, मासाचा गोळाच हवा होता. त्याला स्वार्थ साधायचा नव्हता, सूड उगवायचा होता. तो बेगुमानपणे उत्तरला, "मला तुझे ६००० डुकॅट घेऊन काय करायचे ? त्याच्या सहा पट रक्कम दिलीस तरी तिच्यातील एका डुकॅटलाहि मी स्पर्श करणार नाहीं. मला माझ्या करारप्रमाणे मिळावयाचे तेच मिळाले पाहिजे."

ड्यूकलाहि दिसत होतें, न्याय शॉयलॉकच्या बाजूला आहे. तो त्याची अघोर तृष्णा शमन करणारा आहे. त्या दृष्टीने बोलण्यासारखें काय आहे ? काहींच नाहीं. म्हणून त्याची दयाबुद्धि जागृत करण्याचा प्रयत्न स्वतः न्यायाधीश करू लागले. ते शॉयलॉकला म्हणाले, "अरे तू दुसऱ्यावर दया दाखविली नाहींस, तर तुझ्यावर कोण दया दाखवील ?"

पण या प्रश्नानें शॉयलॉय गोंधळला नाहीं. त्यानें तत्काळ, गोटीनें गोटी उडवावी त्याप्रमाणें, दुसऱ्या प्रश्नानें तो प्रश्न उडवून लावला. त्यानें न्यायाधिशांना विचारलें, "मला दया दाखविण्याचा प्रसंग येतोच आहे कशाला ? मी कोणाचा कसलाच गुन्हा केलेला नाही तर मला न्यायाची डर कशी असेल ? महाराज, आपण आपल्यावरूनच पहा. आपल्या घरी आपण पुष्कळ गुलाम विकत घेऊन कामास ठेवले असतील. अन् त्याना आपण गाढवा-कुत्र्याप्रमाणे, वाटेल तसल्या कामी राबवून घेत असाल. कारण तुम्ही त्याचे मालक आहात. आता मी जर तुम्हाला म्हणावयाला लागलों, 'साहेब, द्या या गुलामाना सोडून अन् लावा त्यांची लग्नं तुमच्या मुलामुलींशी, कशाला लावता त्याना घाम गाळायला ? आपल्यासारखेच चमचमीत भोजन मिळू द्या त्याना. अन् आपल्यासारख्याच मऊमऊ शय्येवर निजूं द्या त्याना.' तर महाराज, आपण मला असेच उत्तर द्याल, 'हे गुलाम माझे आहेत, मी त्याना कसेंहि वागवीन.' माझी भूमिका तीच आहे. मी ॲन्टोनिओचें पोडभर मांस पैसे देऊन विकत घेतले आहे. ते माझ्या मालकीचें झाले आहे. म्हणून ते मला मिळालें पाहिजे. तें आपण नाकाराल तर धिक्कार असो तुमच्या कायद्याला ! व्हेनिसच्या कायद्यात काही अर्थ नाही असेच मी समजेन. बोला, मला न्याय देता कीं नाहीं ? मी येथें न्यायासाठीं हांक मारीत उभा आहे."

शॉयलॉकचा तो निष्ठुर निर्धार आणि त्याचा तो कर्कश युक्तिवाद ऐकून सर्वांची खात्री झाली की, हा सावकार आपला हक्क रतिमात्र सोडणार नाहीं आणि ॲन्टोनिओला आपले प्राण गमावण्यावाचून गत्यंतर नाहीं. हे भीषण भवितव्य ड्यूकच्या नजरेसमोर पेटत्या पलित्याप्रमाणे नाचू लागले आणि म्हणून त्यानें कोर्टाचे काम तहकूब ठेवण्याचें ठरविलें. त्यानें जाहीर केलें, "डॉ. वेलारियो या प्रख्यात कायदेपंडिताना सल्ला देण्यासाठी मी येथे बोलाविले आहे. ते जर आज येथे येऊं शकले नाहीत, तर आजच्या दिवसाचें काम संपले आणि हा खटला नंतर पुढें चालविण्यात येईल असे मी जाहीर करतो."

इतक्यात बातमी आली की, पॅडुआहून दूत आला आहे, अन् त्याने डॉ. बेलारिओचा खलिता आणला आहे. ती बातमी ऐकून ड्यूकला मोठा आनंद झाला. या पेचप्रसंगातून काही तरी तोड त्या कायदेपंडिताने काढली असेल अशी आशा त्याच्या मनात फुलली. "बोलवा त्या दूताला. आणा तीं पत्रे" ड्यूकने घाईघाईने फर्माविले. आणि बॅसानिओला तर काय? आपण संकटातून सुटलोच असे वाटू लागले. घरात कोणी रोगी मृत्युशय्येवर पडलेला असावा, त्याच्या नाकाशी सूत धरलेले असावे आणि अशा वेळीं त्याला बरे करणारा धन्वंतरी तेथे यावा तसेंच सर्वांना वाटले.

बॅसानिओचे डोळे आशेने चमकू लागले. काळजीनें काळवंडलेल्या त्याच्या चेहऱ्यावर हास्याची प्रभा पसरूं लागली. ॲन्टोनिओच्या पाठीवर थाप मारून तो म्हणाला, "गड्या! धीर धर. आनंदाचा क्षण जवळ येत आहे."

पण ॲन्टोनिओ गंभीरच होता. कोणी आले तरी काय होणार? कराराची भाषा स्पष्टच आहे, असेंच त्याचें मन त्याला सांगत होते. ते त्याच्या मुद्रेवरून ओळखून बॅसानिओ त्याला म्हणाला, "मित्रा, माझ्यासाठी तुला आपल्या रक्ताचा बिंदुहि गमवावा लागणार नाही. तो गमावण्यापूर्वी मी माझं मांस, रक्त, हाडं–सर्व काही त्या ज्यूला देऊन टाकीन. तू काळजी करू नकोस."

पण ॲन्टोनिओला आशाच नव्हती. मन घट्ट करून तो सर्व काही सोसण्यास तयार झाला होता. मृत्यूच्या निर्वाणीच्या भूमिकेवर त्याचे मन उभे होते. तो म्हणाला, "बळी द्यायला काढलेल्या व फुलांनी सजविलेल्या बोकडासारखी माझी अवस्था आहे. आता माझा अंत ठरलेलाच आहे. पण

हें चालायचंच. निसर्गांत सर्वांत कच्चं असेल, तेच फळ जमिनीवर लवकर पडतं. तसच माझं शरीरहि लवकर गळून पडत आहे. बॅसानिओ, तूं सुखानं रहा. माझा मृत्युलेख लिहिणं हेच यापुढचं तुझं काम." ॲन्टोनिओ अशी निरवानिरवीची भाषा बोलत होता.

याच क्षणीं वकिलाचा एक कारकून न्यायालयात आला आणि न्याया-धिशाला प्रणाम करून उभा राहिला.



"पॅडूआहून, डॉ. बेलारिओकडून तुम्ही आला काय?" ड्यूकनें प्रश्न केला.

"होय महाराज, बेला-रिओ आपल्याला अभिवादन करीत आहेत. त्यांनी हा खलिता दिला आहे." एक लखोटा ड्यूकच्या हातीं देत कारकून म्हणाला.

न्यायमंदिरात कमालीची उत्सुकता पसरली. तो खलिता हाच आतां ॲन्टोनिओचा त्राता होता. त्यातून कोणता संजीवनी मंत्र बाहेर पडतो हें ऐकण्यासाठी न्यायाधीश, आरोपी, त्याचे मित्र, सर्व नागरिक अत्यंत उत्कंठित झाले होते. पण तो खलिता आणणारा कारकून म्हणजे पुरुष-वेष धारण केलेली नेरिसा आहे, हें कोणालाच माहीत नव्हतें. सारेजण

कारकुनाकडे आदरानें व कृतज्ञतेनें पहात होते. त्याला अपवाद फक्त एक; आणि तो म्हणजे शॉयलॉक.

त्याच्या खिजगणतीत तो खलिता नव्हता. प्रत्यक्ष परमेश्वर खाली उतरला तरी आतां तो आपला हक्क बुडवूं शकत नाही, अशी त्याची बालंबाल खात्री होती. म्हणून तो पुढच्या तयारीस लागला. घरून येतानाच त्यानें अन्टोनिओचे मांस कापण्यासाठी एक सुरी आणली होती व ते तोलण्यासाठीं एक ताजवा पण बरोबर आणला होता. आता तो आपल्या बुटाच्या तळव्यावर ती सुरी घासघासून तिला चांगली धार देत होता.

" आता कशाला ही तसदी घेतोस ! संपलें त्या सुरीचें काम." शॉयलॉक-कडे वळून बॅसानिओ आनंदाच्या भरात म्हणाला. पण अंगावर पडलेली पाल झाडून टाकावी, त्याप्रमाणे शॉयलाकनें त्याचें ते बोलणे उडवून लावले आणि पूर्वीच्याच निर्धारानें तो अॅन्टोनिओकडे बोट दाखवून म्हणाला, " त्या दिवाळ-खोराकडून माझा दंड मी वसूल करणारच. "

हा ज्यू सावकार आपल्या सुरीला धार देत नाही, तर आपल्या वृत्तीलाच द्वेषाची धार देत आहे, असे बॅसानिओला वाटले.

" तळव्यावर सुरी पाजळून तूं आपल्या अधःपाताचा तळच गाठीत आहेस, " असाहि टोमणा कोणीतरी मारला. कोणी तर असेहि म्हणाले, " थोडासा अन्याय झाला तरी चालेल, पण या क्रूर सावकाराला फांशीच दिलें पाहिजे. "

" अहो, या दुष्ट माणसाला पाहिले म्हणजे मला पायथागोरॅसचा सिद्धान्त खरा वाटूं लागतो, " एक प्रेक्षक दुसऱ्याच्या कानात कुजबुजला.

" कोणता तो सिद्धान्त ? " दुसऱ्यानें विचारलें

" जनावराचे आत्मे माणसाच्या शरिरात शिरतात. माणसाला खाऊन टाकण्याऱ्या लांडग्याचा जीव या सावकाराच्या शरिरात शिरलेला असला पाहिजे. त्याशिवाय का तो इतका क्रूर, हिंस्त्र व रक्तपिपासू बनला आहे ? "

पण या टीका-टोमण्याच्या प्रहारानी शॉयलॉकच्या मनाचा दगड कांही फुटत नव्हता कीं जागचा हालत नव्हता. न्यायाधिशाच्या विनवण्यानी ज्याला पाझर फुटला नाही, तो प्रेक्षकाच्या या निंदेने काय चळणार ! " खुशाल ओरडा तुम्ही माझ्या विरुद्ध अन् ध्या आपले घसे फोडून.

माझ्या करारातील एक शब्द तरी बदलण्याची कोणाची छाती आहे का? मी येथें कायदा हातात घेऊन उभा आहें." शॉयलॉक उदासपणे किंचाळला. इतक्यात ड्यूकनें डॉ. बेलारिओकडून आलेले पत्र वाचावयास सांगितले:

"महाराज, आपला खलिता मिळाला तेव्हा मी फार आजारी होतो. पण आपला दूत माझेकडे आला, तेव्हा माझ्याशेजारीं रोमचा एक तरुण वकील बसला होता. त्याचे नांव बाल्थाझार. तो मला सहज भेटावयास आला होता. त्याला मी आपल्यापुढील खटल्याची सारी हकीकत सांगितली. मग आम्ही दोघांनीं कायद्याचीं पुष्कळ पुस्तके उलथींपालथीं केलीं. मी माझें मत त्या वकील-मित्राला सांगितलें. अर्थात तो वकील स्वतः फार विद्वान आहे त्याच्या विद्वत्तेचें वर्णन करावें तितके थोडे. माझ्याऐवजीं त्यानें आपल्याकडे जावें म्हणून मी त्याला विनंती केली. त्याप्रमाणें तो आतां तेथे येत आहे. माझी आपल्याला प्रार्थना इतकीच की, त्याचा तेथे योग्य तो सन्मान व्हावा. तो वयानें तरुण आहे, म्हणून त्याच्या सन्मानात उणेपणा येऊं नये. कारण इतक्या लहान वयात इतकी मोटी बुद्धिमत्ता मी कधींच पाहिली नाहीं. त्याचे थोर गुण आपल्याला प्रत्यक्ष अनुभवानेंच कळतील."

पत्रातील मजकूर ऐकून सर्वांनाच हर्ष झाला. ड्यूकनेंहि हर्षभरानें त्या कारकुनास विचारलें, "कोठें आहेत ते वकीलसाहेब?"

"बाहेरच उभे आहेत ते. आपली परवानगी असेल तर ते लगेच येथे दाखल होतील," कारकुनानें—म्हणजे नेरिसानें—अदबीनें उत्तर दिलें.

"परवानगी? पूर्ण संतोषानें," असे म्हणून ड्यूकनें आपल्या तीन-चार सेवकांना त्या वकील-मित्राला सन्मानानें घेऊन येण्यासाठीं पाठविलें. एक निष्णात वकील एका मुरब्बी कायदेपंडिताचा सल्ला घेऊन येत आहे, हे ऐकून सर्व प्रेक्षक संतुष्ट झाले. ते उत्कंठेनें दाराकडे पाहूं लागले.

दारातून एक तरुण व्यक्ति रुबाबदार पावलें टाकीत येत होती. डोक्यावर काळी टोपी व अंगावर वकिलाचा काळा झगा. हा ऐटदार पोशाख त्या गोऱ्यापान तरुणाला शोभत होता. त्याची मुद्रा मोहक होती व त्याची दृष्टी कोणावरहि छाप पाडण्यासारखी होती. कोणा भक्ताला प्राणसंकटातून मुक्त करण्यासाठीं स्वर्गाचा देवदूतच अवतरला आहे, असें सर्वांना वाटूं लागलें.

तो जवळ येतांना न्यायाधिशानें त्याचा हात आपल्या हातात घेतला व शिष्टाचारानें प्रश्न केला, " तपोवृद्ध बेलारिओकडून आपण आलात ना ? "

" होय महाराज, " मान लववीत वकील उत्तरला. त्याच्या वागणुकीची विलक्षण छाप न्यायाधिशाचे मनावर पटली. त्यानें त्याचें प्रेमानें स्वागत केलें आणि त्याला मानाची जागा बसावयास दिली.

तो वकील म्हणजे दुसरें तिसरें कोणी नसून पुरुषवेषातील पोर्शियाच आहे हें नेरिसाशिवाय दुसऱ्या कोणासच माहीत नव्हतें. पोर्शिया ही वकील व नेरिसा ही त्याचा कारकून, असें वेषांतर त्यांनीं केलें होतें. पण तें इतकें बेमालुम होतें कीं तें कोणासहि ओळखूं आलें नाहीं—बॅसानिओलासुद्धां. " आपल्याला या खटल्यातील वादाचा मुद्दा माहीत आहे ना ? " ड्यूकनें विचारलें.

" होय, मला पूर्णपणें माहीत आहे. पण यातील व्यापारी कोण व ज्यू कोण ? " वकिली पद्धतीनें पोर्शियानें प्रश्न केला. तेव्हा ड्यूकनें ॲन्टोनिओ व शॉयलॉक या दोघांना उभें रहाण्यास फर्माविलें. ते दोघे उठून उभे रहातांच शॉयलॉककडे वळून त्या तरुण वकिलानें—पोर्शियानें विचारलें,

" तुमचें नाव शॉयलॉक काय ? "

" होय, माझें नाव शॉयलॉक. "

" तुमचा खटला विचित्र आहे. पण तो इतका नियमाला धरून आहे कीं, तो चालविल्याबद्दल व्हेनिसचा कायदा तुम्हाला ठपका देणार नाहीं. "

शॉयलॉकनी मान उंचावली. आपण खटला जिंकलाच अशी भावना त्याच्या चित्तात उसळली. विजयाच्या कल्पनेनें डोळे गरगरा फिरवून तो इकडे तिकडे पाहूं लागला.

" शॉयलॉकनें तुमच्यावर संकट आणलें आहे, होय ना ? " पोर्शियानें लगेच ॲन्टोनिओकडे वळून विचारलें.

" होय, " ॲन्टोनिओनें उत्तर दिलं.

" तुम्हाला हा करारनामा मान्य आहे ? " तरुण वकील.

" होय, " अन्टोनिओ.

" म्हणजे आता या ज्यूनें दया दाखविली, तरच तुमचे प्राण वाचणार, " तरुण वकील.

" दया दाखविण्याची सक्ती माझ्यावर आहे काय ? " शॉयलॉक.

शॉयलॉकचा तो निर्दय प्रश्न ऐकून त्या तरुण वकिलानें आपल्या गळ्याची कॉलर मागेंपुढें केली व घसा साफ करून तो त्याचेकडे रोखून पहात बोलू लागला,

" दया हा कांहीं सक्तीनें येणारा गुण नव्हे. आकाशातून आपखुषीनें हळू हळू खालीं पडणाऱ्या पर्जन्यधाराप्रमाणें दया माणसाच्या हृदयात अवतरतच असते. दया दोघांचेंहि कल्याण करते—ती जो दाखवितो त्याचें व ती ज्याचेवर दाखविली जाते त्याचें. समर्थ माणसाचे ठायीं असलेली दया समर्थ बनते. सिंहासनावर बसलेल्या राजाला त्याच्या शिरावरील मुकुटापेक्षा अंत:करणातील दयेनेंच अधिक शोभा येते. त्याच्या हातांतील राजदंड हा त्याच्या भौतिक शक्तीचें प्रतीक असतो आणि तो त्याचा दरारा व धाक इतर राजांवर बसवितो. पण त्या राजदंडाच्या सामर्थ्यापेक्षाहि दयेचें सामर्थ्य मोठं आहे. राजाच्या हृदयसिंहासनावर दया अधिष्ठित झालेली असते. तो ईश्वरी गुण आहे. आणि जेव्हां न्यायाला दयेची जोड मिळते तेव्हां मानवी सत्ता दैवी संपत्तीनें अलंकृत होते. म्हणून शॉयलॉक, मी तुम्हाला सांगतों कीं, तुमची बाजू कितीहि न्यायाची असली, तरी तुम्ही सदय दृष्टीनें विचार करावा. आपणा सर्वांना मुक्ति मिळावयाची ती दयेमुळें न्यायामुळे नव्हे. आपण प्रार्थना करतों ती दयेसाठीं. तुमचा दावा न्यायाचा आहे, पण त्याला दयेनें मृदुत्व आणावे म्हणून मी हें बोलत आहें. नाहीं तर तुम्ही हा दावा हट्टानें पुढें चालविला, तर व्हेनिसचा कडक कायदा या व्यापाऱ्याला शासन केल्याविना रहाणार नाहीं. "

वकीलसाहेब अत्यंत आर्जवानें व युक्तिवादानें शॉयलॉकचे मतपरिवर्तन करूं पहात होते. त्याच्या माणुसकीला पाझर फोडू पहात होते. दयेचा महिमा त्याच्या चित्तावर बिंबवीत होते. पण पाषाणाला पालवी कशी फुटेल ? सूडानें पेटलेला तो सावकार त्या दयेच्या पुराणाला वहिरा झाला होता. त्याचा हट्ट एकच आणि तो म्हणजे—

" कायदा ! कायदा ! ! कायद्याप्रमाणें माझें जें येणें आहे तें मला मिळालें पाहिजे. माझ्या करारनाम्याप्रमाणें या व्यापाऱ्याला शासन झालें पाहिजे— एवढेंच माझें मागणें. अन्याय करा असें नाहीं मी म्हणत. तसे मी म्हणेन

तो जवळ येताच न्यायाधिशानें त्याचा हात आपल्या हातांत घेतला व शिष्टाचारानें प्रश्न केला, " तपोवृद्ध बेलारिओकडून आपण आलात ना ? "

" होय महाराज, " मान लववीत वकील उत्तरला. त्याच्या वागणुकीची विलक्षण छाप न्यायाधिशाचे मनावर पडली. त्यानें त्याचें प्रेमानें स्वागत केलें आणि त्याला मानाची जागा बसावयास दिली.

तो वकील म्हणजे दुसरें तिसरें कोणी नसून पुरुषवेषातील पोर्शियाच आहे हे नेरिसाशिवाय दुसऱ्या कोणासच माहीत नव्हते. पोर्शिया ही वकील व नेरिसा ही त्याचा कारकून, असे वेषांतर त्यांनी केले होते. पण तें इतके बेमालुम होते कीं तें कोणासहि ओळखू आले नाहीं—बॅसानिओलासुद्धा. " आपल्याला या खटल्यातील वादाचा मुद्दा माहीत आहे ना ? " ड्यूकने विचारलें.

" होय, मला पूर्णपणे माहीत आहे. पण यांतील व्यापारी कोण व ज्यू कोण ? " वकिली पद्धतीनें पोर्शियानें प्रश्न केला. तेव्हां ड्यूकने अॅन्टोनिओ व शॉयलाक या दोघांना उभे रहाण्यास फर्माविलें. ते दोघे उठून उभे रहातांच शॉयलॉककडे वळून त्या तरुण वकिलानें—पोर्शियानें विचारलें,

" तुमचें नाव शॉयलॉक काय ? "

" होय, माझें नाव शॉयलॉक. "

" तुमचा खटला विचित्र आहे. पण तो इतका नियमाला धरून आहे की, तो चालविल्याबद्दल व्हेनिसचा कायदा तुम्हाला ठपका देणार नाहीं. "

शॉयलॉकची मान उंचावली. आपण खटला जिंकलाच अशी भावना त्याच्या चित्तात उसळली. विजयाच्या कल्पनेनें डोळे गरगरा फिरवून तो इकडे तिकडे पाहूं लागला.

" शॉयलॉकनें तुमच्यावर संकट आणले आहे, होय ना ? " पोर्शियानें लगेच अॅन्टोनिओकडे वळून विचारलें.

" होय, " अॅन्टोनिओनें उत्तर दिलं.

" तुम्हांला हा करारनामा मान्य आहे ? " तरुण वकील.

" होय, " अन्टोनिओ.

" म्हणजे आतां या ज्यूनें दया दाखविली, तरच तुमचे प्राण वाचणार, " तरुण वकील.

साय तिनें आपल्या मुद्देवर आणला आणि एक मोठा सिद्धान्त सर्वांना ऐकविला

"जो करारनामा खरा म्हणून सिद्ध झालेला असेल तो बदलण्याचें सामर्थ्य या व्हेनिस शहरात कोणाचेंहि अंगी नाहीं. एकदा निर्णय बदलला कीं, पुढिलांना तो दाखला होऊन बसेल आणि राज्याच्या सर्वच कारभारांत मोठा घोटाळा माजेल. तसें कदापि होतां कामा नये. कायदा म्हणजे कायदा! तो पाळला गेलाच पाहिजे."

वकीलसाहेबाचा हा न्यायनिष्ठुर निर्धार ऐकतांच शॉयलॉकला वाटलें, आपल्या कानात अमृताचे बिंदूच पडत आहेत. आपली अघोर लालसा आता पूर्ण होणार याची खात्री वाटून त्याला अपार आनंद झाला. त्या आनंदाच्या भरात तो ओरडला,

"न्याय देण्यासाठीं प्रत्यक्ष धर्मराजच येथे अवतरले. अहो, विद्वान, तरुण न्यायमूर्ति, मी आपला किती जयजयकार करूं?" अशाप्रकारें शॉयलॉकचा पूर्ण विश्वास पोर्शियानें संपादन केला आणि आपल्याला संपूर्ण न्याय मिळणार अशी खात्री त्याला पटविली. नंतर तिनें त्याला म्हटलें,

"तुमचा करारनामा मला पहावयास देता का?"

"हो! हो! घ्या ना हा, माननीय वकीलसाहेब," असें म्हणून शॉयलॉकनें आपल्याजवळील करारनामा मोठ्या अभिमानानें त्या वकिलाच्या हातीं दिला. 'आपण लढाई जिंकलीच!' अशा विजयाच्या भावनेनें तो त्या न्यायालयात जमलेल्या सर्व लोकांकडे पाहूं लागला. इतक्यात त्याचे कानीं वकिलाचे शब्द पडले.

"शॉयलॉक, या करारनाम्यात लिहिलेल्या रकमेच्या तिप्पट पैसा तुम्हाला देण्यात येत आहे. तो आपण स्वीकारणार नाहीं काय?"

"नाहीं, मुळींच नाहीं," आनंदाच्या व निर्धाराच्या स्वरात शॉयलॉक ओरडला. "महाराज, मी परमेश्वराची शपथ घेऊन चुकलों आहे, ती शपथ मी कशी मोडूं? प्रतिज्ञाभंगाचें पातक मी माझ्या शिरावर कसें घेऊ? हे सारें संपन्न व्हेनिस शहर मला कोणी देऊं केलें, तरीहि मी तसें करणार नाहीं."

तर माझ्या डोक्यावर खापर फुटेल. कराराप्रमाणें अॅन्टोनिओनें माझें देणें दिलें पाहिजे."

"मग ? हे व्यापारी पैसे देण्यास असमर्थ आहेत काय ?" वकिलानें खोचक सुरात मुद्याचा प्रश्न केला.

तो ऐकून बॅसानिओला आनंद वाटला. कारण तो दुप्पट रक्कम देण्यालाहि तयार होता. तावडतोब कोर्टात भरण्यासहि तयार होता. आपल्या मित्राचे प्राण वाचविण्यासाठी तो स्वतःचे प्राण देण्यासहि सिद्ध होता. म्हणून तो भावनेच्या आवेगानें एकदम ओरडला,

"अहो, दुप्पटच काय पण दसपट रक्कम देण्याचें मी कबूल करतो ना ? आणि माझे हात, माझें डोकें, माझें हृदय—यांपैकी काहीहि कापून देण्यास मी तयार आहे. आणखी काय पाहिजे ?"

बॅसानिओची ही भाषा ऐकून वकिलानें कौतुकानें मान हलविली. न्याया-धिशाचे मुद्रेवरहि समाधानाची छटा पसरली. "वा ! वा: !" अशी उत्तेजक कुजबुज श्रोतृवर्गात सळसळली.

पण शॉयलॉक ?—त्याचें मन म्हणजे काळा फत्तर ! त्याच्यावर याचा काडी-इतकाहि परिणाम झाला नाहीं. तो तसाच उभा होता.—एका हातात ताजवा व एका हातात सुरी घेऊन कळिकाळाप्रमाणें उभा होता. तोच त्याचा करडा पवित्रा ! तीच त्याची उग्र मुद्रा ! आणि तीच त्याची भेदक दृष्टी ! त्यात लवमात्र फेरबदल झाला नाही. हे दिसताच बॅसनिओ पुढे म्हणाला,

"मी देत असलेली दसपट रक्कम घेऊनहि या सावकाराचें समाधान होत नसेल, तर त्याचा अर्थ त्याला न्याय नको असून केवळ आमचा सूड उग-वावयाचा आहे. येथे द्वेष सत्याची पायमल्ली करीत आहे. वकीलसाहेब, हे आपण होऊं देऊं नये. तसे होऊं नये म्हणून मी आपल्याला प्रार्थना करतो की, आता आपण कायदा हातात घ्या आणि या क्रूर पिशाच्याची अघोर वासना मुरडून मोडून टाका."

"छे छे ! असे कसे होईल ?" वकीलसाहेबांनी एकदम मोहरा फिरवून म्हटलें. त्यावेळी पोर्शियानें असा रुबाबदार अभिनय केला की वा: ! कायद्याचें रक्षण करण्याची सारी जबाबदारी आपल्या जणुं शिरावर आहे असा

"वा! वा! किती चोख न्याय! किती थोर मनाचा न्यायाधीश!" शॉयलॉक हर्षभरानें चित्कारला.

वकीलसाहेब शांत होते, गंभीर दिसत होते. रोग्याच्या वेदनाकडे लक्ष न देतां डॉक्टर जसा आपली शस्त्रक्रिया संथपणें व निर्विकारपणें चालवितो, तसें त्याचें वागणें होतें. 'दोन आणि दोन चार' असा हिशेब सांगणाऱ्या गणिती पंडिताच्या स्थिरचित्तानें तो म्हणाला,

"कायद्याचा हेतु व उद्देश ध्यानांत घेतला, तर या करारनाम्यातील अट पूर्ण होणें मला आवश्यक वाटते."

"खरें, अगदीं खरें! विद्वान व निःपक्षपाती न्यायमूर्ति! आपण म्हणता तें अगदीं खरें आहे. आपण वयानें दिसता तरुण, पण शहाणपणानें किती पोक्त आहांत." शॉयलॉक प्रशंसेचीं फुलें त्या तरुण वकिलावर उधळूं लागला. पण त्याकडे दुर्लक्ष करूनच वकिलानें ॲन्टोनिओला आज्ञा केली,

"तुम्ही अंगावरचे कपडे काढा अन् छाती उघडी करा बघूं."

"बरोबर, बरोबर. छातीच हवी. काळजाजवळीलच मांस हवें. आहे. तसें करारात स्वच्छ लिहिलें आहे. स्पष्ट शब्द आहेत तसे तेथें. होय कीं नाहीं न्यायाधीश महाराज?" शॉयलॉकची अत्यानंदामुळें तारांबळ उडाली. आपल्या यशाचा पेला काठोकाठ भरून आता आपल्या हातीं आला, असें त्याला वाटूं लागलें. आतां तो पेला फक्त ओठाला लावावयाचाच राहिला. त्याला वकिलानें विचारलें,

"मांस वजन करून घेण्यास तुम्हीं ताजवा आणला आहे काय?"

"हो, हो अगदी तयार आहे."

"तसेंच, कोणी शस्त्रवैद्य आणला आहे काय? शॉयलॉक, तो तुम्हीं आपल्या खर्चानें आणला पाहिजे. तो यांची जखम शिवून टाकील. नाहीं तर जखमेंतून रक्त वाहून वाहून ऋणको मरून जावयाचा."

"मी डॉक्टर आणावा असें त्या करारनाम्यात लिहिलें आहे काय?" शॉयलॉकनें खोचक प्रश्न विचारला. आतां त्याचा सर्व आधार म्हणजे तो करारनामा.

वकिलानें त्याचेकडे एकदा बारकाईनें न्याहाळून पाहिलें व मान हालवीत म्हटलें, "नाहीं, तसें कांही या करारनाम्यात लिहिलेलें नाहीं. पण त्याचें

शॉयलॉकचें हे गुरगुरणे ऐकून सर्वांच्या छातींत धडकीच भरली. हा खुनशी सावकार आपला राक्षसी हट्ट मुळींच सोडणार नाही, असा सर्वांचा ग्रह झाला व त्याचा हट्ट पुरविण्यासारखेच कायदेशीर मत वकीलसाहेब बोलूं लागले.

" वा ! हें तर सारें उघडच आहे. या करारनाम्याची मुदत टळून गेली आहे. तेव्हा कायद्याचे दृष्टीने हा सावकार त्या ऋणकोचें अच्छेर मांस हक्काने मागूं शकतो. या ऋणकोच्या काळजाजवळील भाग कापून घेण्याचा त्याला हक्कच आहे. पण तरीहि मी शॉयलॉकला विनंती करतो की, 'महाशय, दया दाखवा. आपल्या कर्जाच्या तिप्पट रक्कम घ्या. मला करारनामा फाडूं द्या. "

किती लाघवी स्वरात त्या वकिलाने दयेची याचना केली ! पण व्यर्थ. मुसळाला का कोठे अंकुर फुटतो ? मुसळासारला कोरडा कठीण शॉयलॉक गरजला,

" करारनाम्यांतील अट पूर्ण झाली म्हणजे मग आपण तो खुशाल फाडून टाका. आपण फार लायक न्यायाधीश आहां असें मला दिसते. आपलें कायद्याचें ज्ञान उत्कृष्ट आहे आणि आपण त्याचें विवेचनहि उत्तम केले आहे. म्हणून मी कायद्याच्या आधारेंच आपल्याला विनंती करतों की, मला न्याय द्या. आपण कायद्याचे आधारस्तभ आहा. तेव्हा कायद्यास धरूनच निवाडा द्या. आणि मी आपल्याला माझ्या प्राणाची शपथ घेऊन सांगतो, माझ्या विचारात बदल करण्याचे सामर्थ्य कोणाहि मानवाच्या जिव्हेत नाही. माझी भूमिका या करारनाम्यावरच आधारलेली आहे. "

शॉयलॉकचा हा अढळ निर्धार पाहून सर्वांना पुढें काय होणार तें कळून चुकले. मात्र त्या निर्धाराला जो बळी जाणार तो ॲन्टोनिओ शांत स्वरानें त्या तरुण वकिलाला म्हणाला,

" आपण आपला निकाल लवकर द्या अशी माझी आपल्याला अंतःकरण-पूर्वक प्रार्थना आहे. "

" निकाल काय ? निकाल ठरलेलाच आहे, अन् तो हा की, आपण आपले काळीज कापून देण्यास तयार व्हावे. "

पहावयास लावायचे; आणि शरीर खंगलेलं आहे, कपाळ सुरकुतलेलं आहे अशा दीन अवस्थेत गरिबीच्या यातना भोगीत त्याला पिचत ठेवायचं. या सर्व यातनांपासून मला दैवानं सोडविलं आहे ही त्याची कृपाच नव्हे का ?”

आणि एकदम निरोप घेण्याच्या भावनेनं तो म्हणाला, “ तुझ्या सन्माननीय अर्धांगीला माझा अंत कसा झाला हे सारं निवेदन कर आणि मी तुझ्यावर किती प्रेम करीत होतों हेंहि तिला सांग. म्हणजे तीच तुला माझ्या प्रेमाची योग्यता पटवून देईल. आपला एक सच्चा मित्र आपण गमावला याचं तुला दुःख होईल, पण त्या दुःखामुळेच मी माझं दुःख विसरेन. तुझ्या प्रेमाच्या बळावरच मी तुझं कर्ज अशा रीतीनं फेडीत आहे. हा ज्यू माझ्या काळजांत आपली सुरी जोरानं खुपसील आणि त्यानं मला मृत्यु येईल; तेव्हा मी तुझं सारं कर्ज फेडलं असं होईल.”

ॲन्टोनिओचे हे निर्वाणीचे शब्द ऐकून बॅसानिओला गहिंवरून आलं. त्याला आपलं दुःख आवरेना. आपल्या सुखासाठी आपल्या डोळ्यांदेखत, आपल्या मित्राचा जीव घेतला जाणार, हें त्याला पाहवेना. आतडें पिळवटून तो ॲन्टोनिओला म्हणाला,

“ नाहीं, मित्रा, मी तुला जाऊं देणार नाहीं. मी माझं सर्वस्व देईन, पण तुला मी मृत्यु येऊं देणार नाहीं माझी पत्नी मला प्राणांपेक्षां प्रिय

काय एवढेंस ? करारनाम्यात नसलें, तरी भूतदयेने आपण एवढें केले तर चागले होईल. ”

“ तसें होणे नाहीं—कारण तसें करारात नाही. ” शॉयलॉकची वाणी म्हणजे काळया फत्तरावरील रेघ. ती पुसली, बदलली जाणे अशक्य. हे ओळखून वकिलानें आपली दृष्टी आता ॲन्टोनिओकडे वळविली आणि त्याला विचारले, “ महाजन, आपल्याला काही सागावयाचे आहे काय ? ”

ॲन्टोनिओची अखेरची घटिका भरत आली. त्याच्या डोळयापुढें कृतान्ताची ध्वजा दिसू लागली. आपण आता इहलोकचा निरोप घेणार अशी त्याला खात्री पटली. मायाममतेचे आपले सारे पाश आता तुटणार, थोड्याच वेळात आपण नष्ट होणार अशी भावना त्याचे चित्तात दृढावली. पण थोर तो थोरच ! तो ऐश्वर्याने फुगत नाही की विपत्तीने दबत नाही. सकटाच्या झझावातातहि त्यांचें चित्त पर्वताप्रमाणें स्थिर असते. ॲन्टोनिओचें मन शात होते. आपण एका उदात्त कार्यासाठी आपला प्राण देत आहो, याचें समाधान त्याच्या चित्तात नादत होते. तो स्थिर स्वराने वकिलाला म्हणाला,

“ महाराज, माझी पूर्ण तयारी आहे. मी शिक्षा भोगण्यास सिद्ध आहे. मला अखेरच्या क्षणी बोलावयाचें आहे, पण तें थोडें. ”

नतर बॅसानिओकडे वळून ॲन्टोनिओ म्हणाला,

“ प्रणाम ! मित्रा, प्रणाम ! तुझा हात माझ्या हातात दे. तुझ्यासाठीं मी या संकटात सापडलों, असं म्हणून तूं वाईट वाटून घेऊं नकोस. कारण दैवाची माझ्यावर ही एक कृपाच आहे. इतकी कृपा देव सहसा कोणावर दाखवीत नाही. ”

बॅसानिओनें त्याचा हात आपल्या हातात घट्ट दाबून धरला. त्याच्या उद्गाराचा अर्थच बॅसानिओला कळेना. दैवाची कृपा ? ही कसली कृपा ? त्याचें मन गोंधळात पडले. गोंधळलेल्या नजरेने तो त्याचेकडे पाहूं लागला. ॲन्टोनिओची वृत्ति अतर्मुख झालेली होती. जणुं स्वत:शीच बोलल्याप्रमाणें तो म्हणाला,

“ अरे, दैवाचा नेहमींचा खेळ असा की, एकादा माणूस श्रीमत असला तर त्याला भिकेला लावायचें; दारिद्र्याचे दशावतार शून्य नजरेनं त्याला

पहावयास लावायचें; आणि शरीर खंगलेलं आहे, कपाळ सुरकुतलेलं आहे अशा दीन अवस्थेत गरिबीच्या यातना भोगीत त्याला पिचत ठेवायच. या सर्व यातनापासून मला दैवानें सोडविलं आहे ही त्याची कृपाच नव्हे का?"

आणि एकदम निरोप घेण्याच्या भावनेनं तो म्हणाला, "तुझ्या सन्मा-ननीय अर्धांगीला माझा अंत कसा झाला हे सारं निवेदन कर आणि मी तुझ्यावर किती प्रेम करीत होतों, हेहि तिला सांग. म्हणजे तीच तुला माझ्या प्रेमाची योग्यता पटवून देईल. आपला एक सच्चा मित्र आपण गमावला याचं तुला दुःख होईल. पण त्या दुःखामुळंच मी माझं दुःख विसरेन. तुझ्या प्रेमाच्या बळावरच मी तुझं कर्ज अशा रीतीनं फेडीत आहे. हा ज्यू माझ्या काळजात आपली सुरी जोरानं खुपशील आणि त्यानं मला मृत्यु येईल, तेव्हा मी तुझं सारं कर्ज फेडलं असं होईल."

अँन्टोनिओचे हे निरवानिरवीचे शब्द ऐकून बॅसानिओला भडभडून आलें. त्याला आपलें दुःख आवरेना. आपल्या सुखासाठीं आपल्या डोळ्यादेखत, आपल्या मित्राचा जीव घेतला जाणार, हे त्याला पाहवेना. आतडे पिळवटून तो अँन्टोनिओला म्हणाला,

"नाहीं, मित्रा, मी तुला जाऊं देणार नाही. मी माझं सर्वस्व देईन, पण तुला मी मृत्यु येऊं देणार नाहीं. माझी पत्नी मला प्राणापेक्षां प्रिय आहे. पण माझे प्राण आणि जग—या सर्वांची किंमत तुझ्या जीवितापेक्षां मी अधिक मानीत नाहीं. या यमदूताच्या तावडींतून तुझी सुटका करण्यासाठी मी त्या सर्वांचा होम करायला तयार आहे."

बॅसानिओचे हे कळकळीचे उद्‌गार ऐकून पोर्शियाला केवढा अभिमान वाटला! आपला पति आपल्या मित्रासाठीं एवढा त्याग करण्यास सिद्ध आहे याचें तिला समाधान वाटलें. आपल्या पतीचा प्रेमळपणाहि तिला पटला. पण त्याचवेळीं तिला एक गंमत वाटली, ती याची कीं, नुकतेच लग्न झालेल्या आपल्या पत्नीच्या प्राणाचा होम करण्यास ही स्वारी तिच्या संमतिविना सिद्ध झाली आहे! म्हणून ती मिष्किलपणें बॅसानिओला म्हणाली. "आपली अर्धांगी जर येथे असती अन् तिनें जर आपले हे सारे बोलणे ऐकलें असते तर तिनें आपल्याला फारसे धन्यवाद दिले नसते."

काय योगायोग पहा. बॅसानिओची अर्धांगी तेथेंच हजर होती, त्याची त्यागाची भाषा ऐकत होती आणि त्याला धन्यवादहि देत होती. पण हे बॅसानिओच्या ध्यानीमनीहि नव्हते.

तशीच दुसरी गंमत नेरिसाचीहि. तीहि पुरुषवेषांत तेथें आलेली. आणि तिचा प्रियकर ग्रॅशियानो हा बॅसानिओचा मित्र म्हणून तेथे आलेला. तोहि आपल्या मित्रावरील प्रेम व्यक्त करण्यासाठीं म्हणाला, "मलाहि एक पत्नी आहे अन् तिच्यावर माझं खरखुर प्रेमहि आहे. तरी मी अशी इच्छा करतों कीं, यावेळी ती स्वर्गात असावयास हवी होती. म्हणजे तिने कोणातरी देवाचें मन वळवून या हिंस्र सावकारांत काही बदल घडवून आणला असता."

ते शब्द ऐकताच वकिलाच्या कारकुनाने ( नेरिसाने ) त्याला टोमणा मारला, "आपल्या बायकोच्या अपरोक्ष तुम्ही तिला स्वर्गवासी करता हे ठीक आहे. पण तिच्यादेखत असे शब्द बोलला असता तर तुमच्या ससारात केवढे वादळ माजले असते !"

पण शॉयलॉकला असल्या वायफळ बडबडीचा कंटाळा आला. तो एक एक मिनिट मोजीत होता. केव्हा एकदा या ख्रिस्ती व्यापाऱ्याचें मास मी कापून घेतों अन् त्याचा सूड उगवतो, असें त्याला झालें होते. म्हणून तो म्हणाला, "काय हो हे ख्रिश्चन नवरे ! खुशाल आपापल्या बायकांच्या जिवावर उठले आहेत. अशा ख्रिश्चन पतीबरोबर माझ्या मुलीन संसार केलेला मला नाहीं मुळींच आवडणार. आमच्या ज्यू जातींतला कोणत्याहि तरुणाशीं तिन लग्न करण फार चागल."

असें म्हणून शॉयलॉकनें आपली दृष्टि पुन्हा त्या वकिलाकडे वळविली. आणि खटल्याचें काम त्वरेने पुढें चालविण्यास विनविले. तो म्हणाला, "वकीलसाहेब, उगाच का वेळ चालला आहे ? झटपट निकाल देऊन टाका ना." निकाल काय होणार याची त्याला खात्री होती. त्याप्रमाणे वकिलाने कायद्याच्या शब्दास धरून निघणारा निकाल निःसदिग्धपणें प्रकट केला. आपल्या प्रत्येक शब्दावर वजन देत, गंभीर स्वराने, वकिलाने निकाल उच्चारला :

"या व्यापाऱ्याचें एक पौंड मांस या सावकाराच्या मालकीचें आहे. न्यायदेवता तें त्याला देत आहे. आणि कायदा तसा हुकूम करीत आहे."

"चोख न्याय! चोख न्याय!"

शॉयलॉक आनंदानें ओरडला. त्याला स्वर्ग ठेंगणा झाला. त्याचा आनंद गगनात मावेना. इतक्यांत वकिलाचे तोंडून निकालाचा उत्तरार्धहि त्याला ऐकू आला.

"तुम्ही हे मांस आरोपीच्या काळजाजवळचें काढून घेऊं शकतां. तें तुम्हाला कायदा देत आहे आणि तसा हुकूम न्यायदेवता करीत आहे."

"काय ही विद्वत्ता! काय हा निकाल!" अशा आनंदाच्या आरोळ्या शॉयलॉकनें पुन: ठोकल्या. "चला, चला, आता निकालाची अंमलबजावणी झटपट होऊं द्या. क्षणाचाहि विलंब नको."

सारी माणसें सुन्न झालीं. सर्वत्र अंधार पसल्यासारखें सर्वांना वाटलें. सर्वांची पूर्ण निराशा झाली. ॲन्टोनिओसारख्या थोर, प्रेमळ व उदार व्यापाऱ्याचा अंत अशा अमानुष रीतीनें झालेला आपल्याला पहावा लागणार याचें सर्वांना मनस्वी दु:ख झालें. जणुं दु:खसागरातच तें सारें न्यायमंदिर बुडून गेलें. त्यातून त्याला वर कोण काढणार? ॲन्टोनिओला कोण वाचविणार? सारी आशाच मावळली. नागरिक उसासे टाकूं लागले. सुस्कारे सोडूं लागले. डोळ्यातून अश्रु गाळूं लागले. एका हातात तराजू घेऊन दुसऱ्या हातात सुरी धारण केलेल्या शॉयलॉककडे जो तो क्रुद्ध नजरेनें पाहूं लागला. जणुं ते आपल्या क्रोधाग्नीत त्याला भस्मसात् करूं पहात होते. पण व्यर्थ! आतां ॲन्टोनिओचा मृत्यु अटळ ठरला. "केवढें हें दुर्दैव! केवढा हा भयंकर प्रसंग!" असे शोकाचे उद्गार उठूं लागले.

"तें पहा, तें पहा, वकीलसाहेब पुन: कांहीं बोलत आहेत वाटतें."

लोकस माणसें कान देऊन ऐकूं लागलीं. त्याचे कानीं वकिलाचे पुढील शब्द पडले.

"थांबा, थोडा वेळ थांबा. या करारनाम्यांत आणखीहि कांहीं विचार करण्यासारखें आहे."

साथ कोण देणार? सहानभूति कोण दाखविणार? 'बरी आली याची हट्टी नरम!' असेच प्रत्येकाची मुद्रा बोलत होती.

आपण या डावांत हरलों, वकिलानें आपल्याला आपलाच पेच घालून चारीमुंड्या चीत केलें, हें ओळखून शॉयलॉकनें आपला विचार बदलला. सूड घेण्याची क्रूर इच्छा त्यानें दूर सारली आणि पैका मिळवण्याची लोभी वासना मनांत धरली. तो त्या वकिलाला आर्जवी स्वरात म्हणाला,

" ठीक आहे, ठीक आहे. कबूल आहे आपला निर्णय. त्या ख्रिश्चन व्यापाऱ्यानें मला कबूल केल्याप्रमाणें कराराच्या तिप्पट रक्कम द्यावी आणि आपली सुटका करून घ्यावी. "

" सारी रक्कम तयार आहे! " बॅसानिओ आनंदाच्या स्वरानें उद्गारला. आतां त्याचा आनंद पोटात मावेना. या कसायाच्या हातून किती कसबानें वकिलानें आपल्या मित्राला सोडविलें. हें पाहून त्याच्या अंतःकरणात हर्षाच्या लाटावर लाटा उचंबळत होत्या. त्याची मुद्रा उल्हासानें फुलून गेली. त्याच्या डोळयात आनंद नाचू लागला. त्या भरात, तिप्पटच काय पण दसपटहि रक्कम द्यावयास तो तयार झाला असता.

पण आता वकील उलटला होता, उग्र बनला होता. तो शॉयलॉककडे क्रुद्ध नजरेनें पहात होता. त्यानें बॅसानिओला हातानें खूण केली व म्हटलें,

" थांबा, या ज्यूला आता केवळ न्यायच मिळेल. पैसे देण्याची घाई करू नका. करारातील कर्जावर त्यानें पाणी केव्हाच सोडलें आहे. आता त्याला त्यात लिहिलेला दंड तेवढा मिळेल. आणि तो दंड म्हणजे फक्त एक पौंड मांस! मात्र मांसाव्यतिरिक्त दुसरें कांहींहि नाहीं. शॉयलॉक, त्या कापून मांस. मात्र रक्ताचा थेंबहि निघता कामा नये. आता एका दुकॅटवरहि तुझी सत्ता नाही. "

" वाहवा! वाहवा! " असे उद्गार ड्यूकच्या तोंडूनहि निघाले. 'चांगली अद्दल घडली या लोभी सावकाराला.' सारे प्रेक्षक आपापसात कुजबुजु लागले.

शॉयलॉक गांगरला. " पैसाहि नाहीं आणि मांसहि नाहीं! " त्याची भयंकर निराशा झाली. " सूडहि नाहीं नि स्वार्थहि नाहीं! " त्याच्या अंगाची लाही लाही झाली. इतक्यात आकाशातील ढगाच्या गडगडाटाप्रमाणें वकिलाचे कडक बोलणें त्याच्या कानीं आलें.

" शॉयलॉक, आता मांस कापून घेण्याची तयारी कर. पण लक्षात ठेव, तसें करतांना रक्ताचा थेंब तूं सांडतां कामा नये. आणि हेंहि लक्षात ठेव कीं, जे मांस तूं कापून घेणार, तें बरोबर एक पौंडच असलें पाहिजे, गुंजभर जास्त किंवा कमी असतां कामा नये. तें मांस तूं एका पारड्यात ठेवल्यानंतर एका केसानेंहि ताजवा इकडे वा तिकडे झुकेल तर लक्षात ठेव, येथील कायद्या-प्रमाणें तुझी सारी मालमत्ता जप्त तर होईलच, पण शिवाय तुला देहान्ताची शिक्षा भोगावी लागेल. "

" देहान्ताची शिक्षा ! " हे शब्द ऐकतात्र ग्रॅशियानोला परम हर्ष झाला. आणि तो ओरडला, " धर्मराजच अवतरला ! दुसरा धर्मराजच अवतरला ! किती योग्य न्याय दिला याने ! " आपणच पूर्वी उच्चारलेले शब्द आपल्याच कानीं उलटून येऊन पडत आहेत हें पाहून शॉयलॉक गोंधळला. सारी सृष्टि गरगरा फिरूं लागली आहे, असा भास त्याला होऊं लागला. या भोंवऱ्यातून आपली सुटका करून घेण्यासाठीं तो जलदीनें म्हणाला, " माझें मुद्दल तेवढें मला द्या म्हणजे मी जातो. "

ते मुद्दल देण्यास बॅसानिओ तयार होता, राजी होता. पण वकिलाने त्याला अडविलें. त्यानें युक्तिवाद केला, " अहो, भर न्यायमंदिरांत या सावकारानें पैसा नाकारला नाहीं का ? त्याला केवळ कराराप्रमाणें निव्वळ न्यायाप्रमाणें फक्त दंड पाहिजे होता. फक्त पौंडभर मांस पाहिजे होतें. तें आणि फक्त तेंच त्याला आतां मिळेल. "

" काय ? माझें नुसतें मुद्दलहि मला मिळणार नाहीं ? " शॉयलॉकनें अखेरचा सवाल टाकला.

" नाहीं ! नाहीं ! नाहीं ! " वकिलानें ठाम निर्णय दिला.

" मग मी आता येथें कशाला राहूं ? हा मी चाललों. " शायलॉक गुरगुरला. पण आता त्याला कोण सोडणार ? तो आतां वकिलाच्या जाळ्यात पुरता सापडला होता. वकील त्याला म्हणाला,

" शॉयलॉक, अंमळ थांब. व्हेनिसच्या कायद्यांत असे सांगितलें आहे कीं एखाद्या परदेशी माणसानें येथील नागरिकाचा जीव घेण्याचा प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष प्रयत्न केल्याचे सिद्ध झालें, तर त्याची मालमत्ता जप्त होईल. आणि त्यापैकीं अर्धी त्या नागरिकाला मिळेल व अर्धी सरकारच्या तिजोरींत

जाईल, शिवाय त्या परदेशी माणसाला मृत्यूची शिक्षा भोगावी लागेल. मृत्यूची शिक्षा रद्द करणें न करणे हे केवळ ड्यूकच्या मर्जीवर अवलंबून आहे. म्हणून शॉयलॉक, तूं आता ड्यूकमहाराजाना शरण जा आणि त्याचेकडे दयेची भीक माग."

"दया! भीक!" हे शब्द कानावर पडले, तेव्हा शॉयलॉकला वाटले आपल्या कानात कोणी तापलेल्या सळयाच खुपशीत आहे. ज्या दयेची त्यानें पूर्वी अवहेलना केली, तीच दया मागण्याचा प्रसंग त्याचेवर आता येऊन ठेपला पण त्याच्याबद्दल सहानूभूति कोणालाच वाटत नव्हती. आणि उलट 'भली खोड मोडली गुलामाची! दुष्टाची!' असेच प्रत्येकास वाटत होते. त्याच्या भावनेला वाचा फोडली ग्रॅशियानोनें. तो शॉयलॉकची कुचेष्टा करीत म्हणाला,

"शेटजी, आता आपण फाशी जावे अशी माझी आपल्याला विनंती आहे. पण एक अडचण आहे. फाशी जाण्यासाठीं तुम्हाला दोरी कोठून मिळणार? तुमची सारी मालमत्ता तर सरकारजमा झालेली. सुतळीचा तोडाहि तुमचा राहिला नाही. पण काही काळजी करूं नका. सरकारी खर्चा-नेंच तुम्हाला फाशी देण्यात येईल. मृत्यूच्या खर्चाचा बोजा तुमच्यावर पडणार नाही."

आतां अशी कितीहि विटंबना शॉयलॉकची कोणी केली असती, तरी त्याला कोणी नावें ठेवली नसती. त्याला पिसाळलेल्या कुत्र्याप्रमाणे कोणी हाकलले, हाणले असते, तरी ते सर्वांना योग्यच वाटले असते. त्याचे स्वतःचे वागणेच तसें राक्षसी होते.

पण "एका गालावर मारले असता दुसरा गाल पुढे कर," ही खिरताची शिकवण, ती सामान्य खिस्ती लोकाच्या अंगी पुरेपूर उतरली नसली, तरी तिचा थोडाफार पाझर त्या ड्यूकचे अंतःकरणात वहात होता. म्हणून शॉयलॉकनें दयेची याचना करण्यापूर्वीच त्यानें जाहीर केले,

"शॉयलॉकच्या मृत्यूची शिक्षा मी रद्द करीत आहे. मात्र कायद्याप्रमाणे त्याची निम्मी मालमत्ता अन्टोनिओला मिळेल आणि निम्मी मालमत्ता सरकारच्या तिजोरीत यावयाची ती शॉयलॉक सौजन्याने वागेल तर त्याला परत मिळेल."

प्राण वचावला तरी पैसा गेला, याचें प्राणप्राय दुःख शॉयलॉकला झालें. आणि म्हणून तो वैतागानें ओरडला, " नका नका, माझ्यावर दया करूं नका. मला जीवदान देऊं नका. पैसा गेल्यावर मला जगून काय करावयाचें ? सारे खांब काढून घेतल्यावर घर कसें टिकेल ? माझ्या जीवनाचें साधन तुम्ही हिरावून घेणें म्हणजे माझे प्राणच घेणें आहे. "

पण त्याच्या आरडाओरडीकडे लक्ष न देता वकिलानें अॅन्टोनिओला विचारलें, "तुम्ही याचेवर काय दया दाखविणार ? ड्यूकसाहेबांनीं दया म्हणून त्याची मृत्यूची शिक्षा रद्द केली. त्याला जीवदान दिलें. तसें तुम्ही काय करणार ?"

अॅन्टोनिओ स्वभावतःच उदार होता, प्रेमळ होता. आपल्याला मिळणाऱ्या शॉयलॉकच्या अर्ध्या जिंदगीवर पाणी सोडण्यास तो तत्काळ तयार झाला. आपला हक्काचा भाग शॉयलॉकच्या जावयाला, शॉयलॉकच्या मृत्यूनंतर मिळावा अशी इच्छा त्यानें प्रदर्शित केली. मात्र त्यासाठीं त्यानें दोन अटी घातल्या. एक अट ही कीं, शॉयलॉकनें तावडतोब खिस्ती व्हावें. अन् दुसरी, आपली सारी धनदौलत आपल्या मृत्यूचे वेळीं आपल्या मुलीला व जावयाला बक्षीस देण्याचा करार, येथेंच, या वेळीच करून द्यावा.

आपला पैसा व आपला धर्म सोडण्याच्या या अटी म्हणजे शॉयलॉकला गिळाव्या लागणाऱ्या कडू जहर गोळ्याच ! जन्मभर त्याचा ज्या खिश्चनांशीं उभा दावा, त्याच्या धर्मांत आपण प्रवेश करावा हें शॉयलॉकला कसें रुचेल ? तो तें मान्य करण्यास का कूं करीत आहे, असें दिसताच ड्यूकनें जाहीर केलें,

" बरोबर आहे, अॅन्टोनिओ यांनीं सांगितलेलें बरोबर आहे. त्याप्रमाणें शॉयलॉक न वागेल तर, मी नुकतीच त्याच्या जिवावर जी दया दाखविली, ती रद्द होईल. "

मग शॉयलॉक काय बोलणार ? हातपाय बांधून आपल्या तोंडात खिस्ती धर्म कोंबला जात आहे, असे त्याला वाटलें. पण करणार काय ? जिवंत रहाण्यासाठीं तें कबूल करणें त्याला भागच होतें. जिवावर उदार होण्याइतका अॅन्टोनिओसारखा उदात्त स्वभाव त्याचा नव्हता.

मोठया नाखुशीनें, नाक मुठीत धरून, आलीया भोगासी सादर रहाण्यास तो तयार झाला. तेव्हा वकिलानें त्याला खोचून विचारलें,

"काय ड्यूमहाराज, आपल्याला यात संतोष आहे ना ?"

"पूर्ण संतोष आहे," शॉयलॉक खालच्या मानेनें, दबल्या सुरात उत्तरला.

वकिलाने कारकुनाला फर्माविले, "दानपत्राचा करारनामा लिहून काढा."

पण आता शॉयलॉकला तेथे दम धरवेना. तो म्हणाला,

"तो करारनामा नंतर माझ्याकडे पाठवून द्या. मी त्यावर सही करीन. आता मला बरे वाटत नाही. मला येथून जाण्याची परवानगी द्या."

"जा, पण मग करारनाम्यावर सही करा," असें म्हणून ड्यूकनें त्याला जाण्यास परवानगी दिली. त्याप्रमाणे शॉयलॉक तेथून रागानें, निराशेने निघून गेला.

दुष्टत्वाचा पराभव झाला, दुर्जन नामोहरम झाला आणि सज्जनांना सौख्य मिळाले, म्हणून सर्वांना आनंद झाला. जो तो त्या तरुण, तरतरीत वकिलाची तोंडभर तारीफ करूं लागला. न्यायासनावर बसलेल्या ड्यूकलाहि संतोष वाटला की, या वकिलाच्या बुद्धिप्रभावामुळे व्हेनिसची न्यायदेवता निष्कलंक राहिली आणि अॅन्टोनियोसारख्या सज्जन नागरिकाच्या गळ्याभोवतालचा मृत्युपाशहि निघाला. म्हणून ड्यूक त्या वकिलाला अत्यंत आदराने व कृतज्ञतेने म्हणाला,

"आपण फार मोठी कामगिरी बजावलीत. आम्हा सर्व व्हेनिसवासियांवर आपण उपकाराचे डोंगर रचलेत. आता माझी आपल्याला प्रार्थना इतकीच की, आपण आज माझ्याबरोबर माझ्या घरी भोजनास यावें."

त्या सन्मानाचा स्वीकार पोर्शियाने आदरपूर्वक केला; पण तिने भोजनास नकार दिला. तिला इतकी सवड होतीच कोठे ? आपले पतिराज बेलमॉटला परत येण्यापूर्वीचा आपण तेथे जाऊन पोचले पाहिजे, अशी निकड तिला होती. म्हणून ती उत्तरली, "महाराजांनी मला क्षमा करावी. आज रात्रीच मला पॅडुआला परत गेले पाहिजे. त्यासाठी मी आत्ताच आपला निरोप घेणें जरूर आहे."

ड्यूकला ते पटले. त्याला वाटले, साहजिकच आहे; एवढा निष्णात कायदेपंडित ! त्याच्या पाठीमागे किती तरी खटल्याची गर्दी असणार ? त्याला क्षणाची तरी उसंत कशी असणार ? म्हणून एकदा त्याचे आभार मानून ड्यूकने त्या तरुण वकिलाचा निरोप घेतला.

आणि जाता जाता ड्यूकनें ॲन्टोनियोला सूचना केली की, " या महा-भागाला चांगलें पारितोषिक देऊन त्याच्या ऋणातून मुक्त व्हा. याचे तुमच्यावर तर फारच उपकार आहेत. "

ॲन्टोनियो व बॅसानियो हे तर काय? त्या वकिलाचे जन्माचे ऋणी झाले होते. आपल्या कातड्याचे जोडे त्याच्या पायात घातले, तरी त्याचे उपकार फिटणार नाहींत, असेंच त्याना वाटत होते.

बॅसानिओ आपल्या हृदयांतील भावनाना वाट करून देण्यासाठी उद्गारला, " माननीय वकीलसाहेब, केवळ आपल्या चातुर्यानं मी व माझा हा मित्र आज महान संकटातून मुक्त झालों. या उपकाराची फेड आम्ही कशी करू शकणार? तथापि, फूल नाहीं फुलाची पाकळी म्हणून, आम्हाला शॉयलॉक-कडून मिळणारी तीन हजार ड्यूकॅटची रक्कम आम्ही आपल्याला प्रेमाची भेट म्हणून आनंदानं अर्पण करतो. आपण सद्भावानें जे परिश्रम घेतलेत त्याच्याविषयींची कृतज्ञतेची ही अल्पशी खूण आहे, असंच समजा. "

ॲन्टोनियोनेंहि मान हलवून संमति दर्शविली आणि म्हटले, " ही अल्पस्वल्प भेट आपण स्वीकारली तरी आपल्या प्रेमामुळं व सेवेमुळं आम्ही आपले निरंतरचे ऋणीच राहूं. "

पण वकील निरिच्छ! त्याला ते पैसे घेऊन काय करावयाचे? पैशाच्या राशीवर लोळणाराच तो!—म्हणजे पोर्शिया! स्त्री-स्वभावास अनुसरून, तिच्या मनात या वेळीं एक गंमत करण्याचें आले. वकिलाचा वेष करण्याचें तिचें कारस्थान चांगलेंच सिद्धीस गेले होतें; त्यामुळें तिला आपल्या प्रिय-कराची चेष्टा करण्याची ऊर्मि आली. संशय—मत्सर—कलह याविना प्रणयाला लज्जत कशी येणार? सरबताला मीठ, तसा प्रेमाला कलह गोडीच आणतो. म्हणून पोर्शियानें मनातल्या मनांत एक कट रचला व ती वकिली रुबाब व गांभीर्य कायम ठेवून ॲन्टोनियोला म्हणाली,

" ज्याच्या मनीं संतोष, तोच खरं पारितोषिक पावला असं म्हटलं पाहिजे. आणि आपली मुक्तता झाल्यानं मला पूर्ण संतोष झाला आहे—त्यामुळं मी माझं बक्षीस पावलों आहें. मला याहून लोभ नाहींच. पुनः आपली भेट होईल, तेव्हा ओळख ठेवा म्हणजे झालं. देव आपलं कल्याण करो. जाऊं मी आता? "

'केवढे चातुर्य! केवढे औदार्य!' असे विचार बॅसानिओच्या चित्तात चालले होते. तो त्या वकिलाच्या एकएका गुणानें दिपूनच गेला. त्याला रिक्तहस्ताने जाऊ देणे बॅसानिओला बरें वाटेना. म्हणून तो त्याला आग्रहाने विनती करूं लागला,

"प्रिय महाशय, आपल्या वकिलीची फी म्हणून नव्हे पण आपल्या भेटीची खूण म्हणून आपण काहीतरी घ्यावे अशी माझी कळकळीची विनंती आहे."

आता बॅसानिओ आपण जे मागू ते देईल अशी खात्री पोर्शियाला वाटली आणि म्हणून तिने अधिक ताणून न धरण्याचे ठरविले. त्याच्या आग्रहाला व प्रेमभावनेला मान देत ती म्हणाली,

"आपण इतका आग्रहच करता, तर आपले हातमोजे मला द्या. ते मी माझ्या हातात घालीन, म्हणजे आपले स्मरण निरतर राहील. तसेच आपल्या प्रेमाची खूण म्हणून आपल्या बोटातील ही अंगठी तेवढी द्या म्हणजे झालं. आपण नाही म्हणणार नाही, ही मला खात्री आहेच. आणि मी अधिक काहीं मागणारहि नाही".

'अगठी' हे शब्द ऐकताच बॅसानिओचें हृदय थरकले. आपल्या काळजाचाच तुकडा कापून कोणी मागितला असें त्याला वाटले. कारण, त्याच्या प्रिय सखीने–पोर्शियाने–ती अंगठी त्याला प्रेमाची खूण म्हणून दिली होती. आणि ती देताना बजावले होते,–"ही अगठी तुम्ही आपल्या बोटातून कधींहि दूर करूं नका–कोणासहि देऊं नका."

आणि 'प्राण गेला तरी ही अंगठी मी कोणास देणार नाही' असें वचनहि त्यानें आपल्या प्रियेस दिले होते. प्रेमाचे ते चिन्ह! विवाहाच्या वाङ्‌निश्चयाचें तें प्रतीक! एकमेकाच्या आणाभाकानी मतरलेली ती वस्तु! ती बॅसानिओ कोणाला कशी देणार? अंगठी असलेला त्याचा हात सहजच मागे गेला; आणि तो त्या वकिलाला म्हणाला,

"छे:, छे:, ही अंगठी म्हणजे किती क्षुद्र वस्तु; ती मी आपल्याला देऊन मी स्वतःला कमीपणा कधीहि आणणार नाही. मी तिच्यापेक्षा शतपट मोलाची दुसरी अगठी देतो."

पण पोर्शिया ऐकते होय? तिला अंगठीच हवी होती–आणि तीच अगठी हवी होती. ती हट्टाने म्हणाली, "मला ही अगठीच हवी–दुसरे काही एक नको. तिच्यावर माझं मन बसलं आहे असच का म्हणानात?"

बॅसानिओ पेचात सांपडला. तो आर्जवानें म्हणाला, "माझ्या व्हेनिस शहरांत दवंडी देऊन सर्वांत मूल्यवान् अंगठी मी आणवतों नि ती आपल्याला देतों."

पण छट् ! वकिलाचा हट्ट त्या अंगठीसाठींच ! ती अंगठी मिळत नाहीं, असें पाहून तो बॅसानिओला खोचून म्हणाला,

"मला वाटतं, आपण आश्वासनं देण्यातच अवळपवळ आहांत, महाराज, 'काहीं मागा,' म्हणून आपणच मला सांगितलं. आणि आता मी मागणी केल्यावर मागणी कशी फेटाळून लावावी याचे धडे आपण मला देत आहात ! वाः फारच छान ! !"

वकिलाचा खोचक घाव बॅसानिओच्या वर्मीच बसला. त्याचा गैरसमज दूर करण्यासाठीं त्यानें त्या अंगठीचा सारा इतिहास त्याला निवेदन केला आणि प्रेमाच्या राज्यात तिचें महत्त्व किती आहे, हें त्याच्या मनावर ठसविलें. पण पालथ्या घड्यावर पाणी !

पोर्शियाला मनातल्या मनात मोठं समाधान वाटत होतं; बॅसानियोच्या प्रेमनिष्ठेबद्दल अभिमानच वाटत होता. पण जणु आपला मोठा अपमानच झाला, असें दाखवून, ती तेथून रागानें जावयास निघाली. जाता जाता ती फणकाऱ्यानें म्हणाली,

"पुष्कळ पुरुष अशाच सबबीवर मूल्यवान वस्तु देण्याचें टाळतात. पण महाराज, मला वाटतं, आपली अर्धांगी समजुतदार असेल. तिला आपण ही अंगठी, कोणाला, कशासाठीं दिली, हें कळलें तर तिचा राग आपणावर खास होणार नाहीं पण आपल्याच मनात अंगठी द्यावयाची नसेल ! तें कसंहि असो, तुम्हीं शांततेनं, सुखानं, रहा. आम्ही चाललों."

असें म्हणून पोर्शिया नेरिसासह तेथून तडक निघून गेली.

वकील व त्याचा कारकून दोघे निघून जाताच ॲन्टोनियो व बॅसानियो या दोघांच्या चित्तात काहूर माजलें. बॅसानियोचें अंगठी न देण्याचें कारण खरें होतें, सबळ होतें, हें ॲन्टोनियोला पटत होतें; पण—"तो आपला केवढा उपकारकर्ता ? प्रत्यक्ष प्राणदाताच ! देऊन टाक त्याला ती अंगठी ! त्याबद्दल तुझी बायको तुला जी शिक्षा देईल, ती तूं खुशाल भोग," असें तो बॅसानियोला म्हणाला.

बॅसानियोनें ते मान्य केले. त्याने ग्रॅशियानोला धावत जाऊन ती अंगठी त्या वकिलाला देण्यास सांगितले. बॅसानियो व अॅन्टोनियो या उभयतांनी दुसरे दिवशी प्रभातकाली बेलमॉटला जाण्यास निघण्याचें ठरविले.

ग्रॅशियानोने वकिलाला गाठले व त्याला ती अंगठी अर्पण केली. तिचा स्वीकार पोर्शियाने आभारपूर्वक केला. तिने शॉयलॉकचे नवे करारपत्र तयार करवून आणले होते, ते शॉयलॉकला देऊन त्यावर त्याची सही आणण्यास तिने नेरिसाला आज्ञा केली; आणि शॉयलॉकचें घर आपल्या कारकुनाला दाखविण्यास ग्रॅशियानोला सूचना दिली. तेथून निघताना वकिलानें आपल्या कारकुनास ताकीद दिली, "काही झाल तरी, आज रात्री आपल्याला येथून निघालंच पाहिजे." नेरिसाने होकारार्थी मान हालविली आणि ती ग्रॅशियानो-बरोबर शॉयलॉकच्या घराकडे चालू लागली.

नेरिसा ही पोर्शियाचीच दासी. तितकीच हुशार अन् तितकीच मिस्किल. दोघींचीहि नुकतीच लग्ने झालेली. तिनेहि वाटेनें बोलतां बोलतां, ग्रॅशियानो-कडून, आपण त्याला पूर्वी विवाहाचे चिन्ह म्हणून दिलेली अंगठी बक्षीस म्हणून उपटली.

धणीण व नोकरीण दोघींनीं आपल्या प्रियकराकडून प्रेम-प्रतीके हिक-मतीने परत मिळविली. नतर त्या दोघी बेलमॉटकडे तातडीने निघाल्या. "आपण या पुरुषाची चांगली फजीतीच करूं," नेरिसा म्हणाली.

"अग, हे पुरुष वाटेल त्या शपथा घेऊन आपल्याला सांगतील, 'आम्ही अंगठी दुसऱ्या पुरुषाला दिली—स्त्रीला नव्हे.' पण आपण त्याच काही ऐकायचं नाही." पोर्शिया उद्गारली.

इच्छिलेले कार्य सफळ झाले म्हणून त्या दोघी खुषीत होत्या. त्याच्या त्या आनंदावर विनोदाचा तवंग पसरण्याचें काम अंगठी-प्रकरण करीत होते. या अंगठी-प्रकरणावरून आपण आता आपल्या पतिराजाची कसकशी गंमत करूं, या कल्पनाच्या लाटावर पोहत पोहत पोर्शिया व नेरिसा-दोघीजणी बेलमॉटला जाऊन पोचल्या.

त्यावेळी आकाशात असंख्य चांदण्या चमचमत होत्या—आणि तशाच आनंदाच्या अगणित चांदण्या त्या प्रेमळ युवतीच्या मनातहि चमकत होत्या.



## ★ अंगठीचें कोडें : ५

अशाच एका चांदण्या रात्रीं—

पुराणकालांतील प्रियकरांनीं आपल्या प्रेमाचा आनंद लुटला आहे. लोरेंझो आपल्या प्रियकरिणीच्या कानांत कुजबुजत होता. तो आणि जेसिका हीं तात्पुरतीं का होईना, त्या प्रशस्त प्रासादाचीं, मालकच बनलीं होतीं. त्या वाड्याची मालकीण पोर्शिया बेलनिमहून परत येईपर्यंत हे नवदांपत्य तेथें राजा-राणीप्रमाणें विहार करीत होतें.

आणि आज रात्रीं तीं दोघें वाड्याभोंवतालच्या बागेंत स्वच्छंदानें फिरत होतीं, प्रेमाच्या गुजगोष्टी करीत होतीं. आकाशात चन्द्र प्रसन्नपणें प्रकाशत होता. वाऱ्याची गोडशी झुळूक मंदपणे येऊन वृक्षवेलींचें चुंबन घेत होती. आणि त्या दोघां युव-युवतींच्या अंतःकरणात प्रेमाचे तरंगावर तरंग उठत होते. त्यांना पुराणकालांतील एकेका प्रेमिकाच्या जोडीचें स्मरण होत होतें. बागेंतील एका शिलाखंडावर बसून दोघें एकमेकांना त्या पुराण–प्रणयकथा ऐकवीत होतीं.

तुम्ही असें सुंदर गीत गा कीं, त्यामुळें गगनाच्या मंचकावर निद्रिस्त झालेला चंद्रमा उठून जागा होईल आणि आपल्या घराची वाट चालू लागेल. त्याचप्रमाणे त्या संगीताने या घराची मालकीण येथे परत येईल, असेहि करा. ”

आणि खरेच ! त्या संगीताच्या गोड आलापात, त्या मावळत्या चंद्राच्या स्वच्छ प्रकाशात, त्या सरत्या रात्रीच्या गाढ शांततेत, पोर्शिया नेरिसासह आपल्या वाड्याजवळ आली. त्यावेळीं तिच्या दिवाणखान्यात मेणबत्तीचा मंद प्रकाश पडलेला होता. तो प्रकाश खिडकीतून दिसताच पोर्शियाला आनंद झाला व ती म्हणाली,

“ मेणबत्ती ती केवढी ! पण केवढा प्रकाश ती पसरते आहे पहा. सत्कृत्याचंहि असंच असतं. या दुष्ट जगावर ल्हानशा सत्कृत्याचाहि मोठा प्रकाश पडतो. ” आणि हा सुखद अनुभव तिने स्वतः नुकताच घेतला नव्हता काय ? तिने आपल्या चातुर्याने व औदार्याने ॲन्टोनिओची मुक्तता केली होती. या तिच्या सत्कृत्याच्या प्रकाशाने कितीतरी लोकांची मुखे उजळली होती.

नेरिसा म्हणाली, “ आता चंद्र मावळला, म्हणून मेणबत्तीचा प्रकाश दिसू लागला. चंद्राच्या प्रकाशापुढं तिचं काय चालणार ? ”

आपल्या दासीचे हे चतुर बोल ऐकून पोर्शियाचें मन सुखावले. नेरिसाच्या या कल्पनेने तिला चांगलीच चालना मिळाली. ती म्हणाली “ अग, असंच आहे. मोठा प्रकाश ल्हानाला मंद बनवितो. राजा नाही तोंवर त्याच्या गादीवर दुसरा कोणी विराजतो. पण त्याच तेज कोठवर ? राजा पुनः सिंहासनावर येऊन बसेतोवर. राजा आला की, त्याच्या प्रकाशात याच तेज मिसळून जात—समुद्रात ओहोळ मिसळावा तसं. ”

‘ आपलं कृत्य मंगल तर खरच, पण आपल्यापेक्षा स्वतःच्या मित्रासाठीं जिवावर उदार झालेल्या ॲन्टोनिओचं कृत्य अधिक मंगल !—त्याचाच प्रकाश मोठा ! ’ असेच काहीसे विचार पोर्शियाच्या मनात खेळत असावेत.

संगीताचे सूर पोर्शियाच्या कानीं पडले. ते ऐकून ती म्हणाली, “ आधींच संगीत मधुर ! त्यात ही प्रशांत व प्रसन्न वेळ. त्यामुळ ते अधिकच मधुर वाटतं. नाहीतर दिवसाच्या गडबडींत, गोंगाटात बुलबुलाचे बोल काय अन् रातकिड्याची किरकिर काय ? दोन्हीहि सारखीच ! पण आता हे संगीत पुरे. ”

संगीत थांबलें. पोर्शियाने आपल्या घरात पाऊल ठेवलें. लोरेंझोने तिचें स्वागत केलें.

" आमचे पतिराज परत आले आहेत का ? " पोर्शियाने त्याला विचारलें. जणु काहीं आपल्याला बॅसानिओची काहीच माहिती नाहीं असें तिनें दाखविलें.

लोरेंझोने उत्तर दिलें, " बॅसानिओ आत्ताच येतील असा निरोप आला आहे. "

पोर्शियानें नेरिसाला सांगितलें, " जा, घरातील सारी व्यवस्था नीट ठेव. आपण दोघीजणी येथें नव्हतों हे कोणाला समजूं देऊ नका असें नोकरांना सांग. जा. "

इतक्यात कर्णा वाजूं लागला. बॅसानिओ परत आल्याची ती खूण होती. थोड्याच वेळात बॅसानिओ, अॅन्टोनिओ, ग्रेशियानो आणि इतर मंडळी वाड्यात येऊन दाखल झाली. दारातच पोर्शियाला पाहून बॅसानिओला आनंद वाटला. अन् तो म्हणाला.

" ही रात्र की दिवस ? रात्रीहि तूं हिंडूं लागलीस तर आम्हाला दिवसाच तेज दिसूं लागेल. "

" तेज दिसलं तर चांगलंच. पण मी मात्र तेज वृत्तीची नाहीं हं. हलकी पत्नी पतीला डोईजड होते म्हणतात तशी मी नाहीं होणार. चलावं महाराज, आत यावं. " पोर्शियानें केलेल्या या विनोदावर सारेजण हंसले. बॅसानिओनें तिला अॅन्टोनिओची ओळख करून दिली, " हा माझा मित्र. याचे मजवर अपार उपकार आहेत ! "

पोर्शियाने अॅन्टोनिओला आदराने अभिवादन केलं. जणुं ती आपल्या नेत्रांच्या नीराजनांनी त्या मित्रप्रेमी दानवीराला ओवाळीतच होती. ती एवढेच म्हणाली, " मित्रासाठी आपण बंधनात पडलात आणि मित्राला आपल्या बंधनात कायमच जखडून टाकलंत. "

अॅन्टोनिओला हा स्तुतीचा भार सहन झाला नाहीं. थोरांना आपल्या थोर कृत्याचा गौरव होणं नकोसं वाटतं. अॅन्टोनिओनें उत्तर दिलें, " आता काय त्याचं ? आता तर मी त्या बंधनातून मुक्तच झालो आहे. "

विनयाने शोभणारी त्याची थोरवी मनात मुरवीत पोर्शियाने त्याचें विशेष अगत्यानें स्वागत केलें.

" मी नुसती बोलत काय बसले ? आपलं स्वागत नुसत्या गोड बोलानीं कसं करून चालेल ? " म्हणून ती आत जावयास निघाली.

इतक्यात तिच्या कानी भांडणाचा कलकलाट आला. ते भांडण प्रेमाचं होते——नेरिसा व ग्रॅशियानो याच्यामधलं होतं. ते ऐकून पोर्शिया तेथेच थबकली; आणि तिने ग्रॅशियानोला विचारलं, " काय हो ? तंटा कशाबद्दल ? "

तेव्हा ग्रॅशियानो म्हणाला, " बाईसाहेब, ही नेरिसा पहा कशी निष्कारण तणतणते आहे. बाब ती किती साधी ! एक मामुली अंगठी. म्हणजे सोन्याचं एक वेटोळं ! दिलं होतं ते तिनं मला, केव्हा एका काळी. हां, त्याच्यावर लिहिलेलं होतं–' माझेवर प्रेम करा. मला हरवूं नका. ' पण हे असलं काव्य काय ? कोणत्याहि कपत्रशीवर, नाहींतर, चाकूसुरीवर लिहिलेलं असतं. ती अंगठी माझ्याकडून हरवली गेली. पण त्याचं काय मोठसं ? "

त्याचे ते तुच्छेतेचे उद्गार ऐकून नेरिसाला विलक्षण संताप आला; निदान तो आला असे तिने दाखविले. आपण लग्नात आपल्या प्रेमाची खूण म्हणून जी अंगठी दिली, आणि जी हरवूं नको म्हणून आपल्या प्रियकराला बजबजावून सांगितलं, ती अंगठी हा आपला प्रियकर दोन दिवसांत गमावतो आणि वर तिची किंमत कःपदार्थ लेखतो, याचा तिला मनस्वी राग आला– निदान तिने तसा तो दाखविला. क्रुद्ध नजरेने व हातवारे करून ती सर्वांसमक्ष ग्रॅशियानोवर तणतणूं लागली.

" तुम्ही अंगठीची किंमत करता अन् तिच्यावरील काव्याची चेष्टा करता ! ' यावज्जीव ती मी आपल्या बोटात प्रेमाने बाळगीन ' अशी शपथ तुम्ही घेतली होती ती इतक्यातच विसरलात वाटतं ? निदान शपथेचा तरी मान तुम्ही ठेवायला हवा होता. काय म्हणे, ती अंगठी एका वकिलाच्या कारकुनाला दिली ! कोण विश्वास ठेवील अशा थापावर ? नक्की कोणातरी बयेनंच ती पळविली असली पाहिजे. "

आपल्या नववधूचा हा तोफखाना त्या तरुण शिलेदाराला सहन होईना. ग्रॅशियानो पुनः पुन्हा नम्रपणे सारा वृत्तांत सरळपणे सांगत होता. " तरुणीला नव्हे तरुणाला. थेट तुझ्याएवढ्या तरुण कारकुनाला, त्यानं फी मागितली म्हणून नाइलाज होऊन मी ती अंगठी दिली. कसं नाही पटत तुला ? "

असे नेरिसाला तो कळवळून म्हणाला आणि अखेर हें भांडण लवकर तुटावें म्हणून पोर्शियाकडे त्यानें दाद मागितली.

" पहा हो बाईसाहेब, ही माझ्यावर कसा भलताच आळ घेते आहे. अगदीं निष्कारण आहे हो. आपण तरी सांगा कांहीं तिला. "

आपल्या पतिराजाची ती केविलवाणी भाषा व दीनवाणी मुद्रा पाहून नेरिसा मनांतल्या मनांत हंसूं लागली. तशीच तिची धनीण पोर्शियाहि हंसूं लागली. त्या दोघींनीं आपापल्या प्रियकराकडून आपल्या प्रेमाच्या अंगठ्या हिकमतीनें परत मिळविल्या होत्या. आणि आतां, त्यांनीं त्या अंगठ्या दुसऱ्या तरुणींना प्रेमचिन्ह म्हणून दिल्या, असा लटका आरोप त्या दोघी आपापल्या प्रियकरावर करीत होत्या. आपल्या आरोपाला चांगली रंगत यावी म्हणून पोर्शियानें साहजिकच नेरिसाची कड घेतली आणि नाटकी रागानें ती ग्रॅशियानोला म्हणाली,

" हे पहा, मला आता स्पष्टच बोललं पाहिजे. या प्रकरणीं तुम्हीच खरे दोषी दिसता मला. अहो, आपल्या अर्धांगीनं प्रेमानं बहाल केलेली पहिली देणगी ! आणि ती तुम्ही सहज लीलेनं गमावून टाकता—देऊन टाकता दुसऱ्याला ! काय म्हणावं तुम्हाला ? असं प्रेमचिन्ह माणसाच्या रक्तामांसात भावनेनं कसं पक्कं रुतून बसलं पाहिजे. शपथांच्या धाग्यांनीं तें आवळून बांधलेलं असतं. आता माझीच गोष्ट पहा ना. मी माझ्या प्रियकराला अशीच अंगठी प्रेमाची भेट म्हणून अर्पण केली आणि ' तिला कधीं अंतर देऊं नका, ' म्हणून बजावलं. त्याप्रमाणं माझी वालंबाल खात्री आहे कीं, माझे बॅसानिओ माझ्या त्या अंगठीला क्षणभरहि कधीं विसरणार नाहींत. कुबेराची संपत्ती त्याच्यापुढं आणून ओतली तरी ते कांहीं आपल्या बोटांतून ती अंगठी उतरणार नाहींत, असा मला विश्वास आहे. पण ग्रॅशियानो, तुम्ही आपल्या पत्नीच्या तीव्र दुःखाला कारण करून दिलंत. खरोखर, माझ्या बाबतींत असं घडलं असतं, तर मी वेडीच झाले असतें. "

हें सारें त्वेषाचें भाषण ऐकून ग्रॅशियानोला तर वेदना झाल्याच, पण इकडे बॅसानिओच्या हृदयाला एकसारखे विंचू डसल्यासारखें होऊं लागलें. पोर्शिया बोलत होती एकाला उद्देशून, पण तिचें बोलणें जाऊन भिडत होतें

दुसऱ्याच्या काळजाला ! तिचे ते वाग्बाण बॅसानिओला असह्य झाले. त्याला वाटूं लागले,

' मी माझा डावा हात तोडून टाकला असता तरी बरं झालं असतं. म्हणजे मी पोर्शियाला सांगितलं असतं, ' माझ्या हातातली अंगठी कोणी हिरावून नेत होता पण त्याला मी ती नेऊं दिली नाही, म्हणून त्यानं माझा हा हातच कलम केला पहा ! ' पण आता काय ? मीहि अंगठी गमावली. हे कळताच पोर्शियाच्या अंगाचा कसा तिळपापड होईल ! '

आणि पोर्शियाला ते लगेच कळलेंहि. आपली बाजू भक्कम करण्यासाठी ग्रॅशियानोनें दोन्ही अंगठ्याचा व्हेनिसमधील सविस्तर इतिहास तिला सांगितला. तो ऐकून पोर्शियाने चांगलेंच नाटक केले. ती धावत धावत बॅसानिओकडे गेली आणि त्याच्या मुद्रेकडे टक लावून पहात विचारूं लागली,

" प्राणनाथ, कोणती अंगठी आपण दिलीत ? मी दिलेली तर नाही ना ? "

बिचारा बॅसानिओ काय उत्तर देणार ? त्याच्या हातुन अपराध तर घडलाच होता. त्या अपराधाला असत्याचा आधार तो देऊं शकत नव्हता. काहीं न बोलता त्यानें आपलं अंगठीचे बोट तिच्या डोळ्यापुढें धरले. ते बोट रिकामे होते.

" जसं तुमचं बोट, तसंच तुमचं हृदयहि रिकामंच असल पाहिजे. मी देवाशपथ तुम्हाला सांगते, तुमच्या हातात ती अंगठी दिसल्याशिवाय मी तुमच्याबरोबर संसारच करणार नाही. "

आपल्या मस्तकावर जणुं कुऱ्हाडच कोसळली, असे बॅसानिओला वाटले. तो कापऱ्या आवाजात पोर्शियाची आळवणी करूं लागला,

" आवर, तुझा संताप आवर प्रिये. ती अंगठी मी कोणाला दिली, कुणासाठीं दिली, कशासाठी दिली अन् किती नाखुषीनं—दुसरा काहींच उपाय नव्हता म्हणून—कशी दिली, हें जर तुला कळलं तर तू भलता संशय घेणार नाहीस नि नसता राग धरणार नाहीस. "

पण ' संशय-खट झोटिंग महा ! ' त्या संशयाने आपले मन पछाडले आहे असे पोर्शिया दाखवीत होती. ती तावातावाने त्याला बोलूं लागली,

" त्या अंगठीचे गुण काय आहेत, ती अंगठी देणाऱ्याची योग्यता काय आहे अन् ती अंगठी घेणाराची केवढी प्रतिष्ठा तिच्यावर अवलंबून आहे, हे

जर आपल्याला माहीत असत आणि म्हणून आपण ती अंगठी आपल्या-जवळ ठेवण्यासाठीं जिवापाड कष्ट केले असतेत, तर असा पागल माणूस कोण आहे कीं, जो त्या अंगटीचा आग्रह धरील? क्वचित्, क्वचित एखाद्या तरुणीनेंच ती माझी अंगटी पळवून नेली असली पाहिजे—अन् तिच्याबरोबरच माझं प्रेमहि!"

तिच्या मनातील हा संशय दूर करण्यासाठीं बॅसानिओ न्यायमंदिरातील सारा इतिहास तिला सविस्तर सांगूं लागला. पण झोपेचें सोंग घेणाऱ्याला जागे कोण नि कसें करणार? आपल्या प्राणप्रिय मित्राची प्राणसंकटातून सुटका केल्याबद्दल त्या वकिलाला आपण ३००० डुकॅट देण्यास कसे तयार झालों, ते त्यानें कसें नाकारलें, पण त्यानें ती अंगठी किती आग्रहानें मागितली, आपण कसा नकार दिला, त्यामुळें तो नाराज होऊन कसा जाऊं लागला, त्या कृतघ्नतेमुळें आपल्या दानतीला कमीपणा येईल असें वाटल्यामुळें आपण ती अंगटी नंतर त्याच्याकडे कशी पाठवून दिली—हा सारा खराखुरा इतिहास त्यानें तिला निवेदन केला. आणि तो म्हणाला, "या आकाशातील तेजस्वी तारकाची शपथ घेऊन मी तुला सांगतों कीं, मी ती अंगठी त्या वकिलालाच दिली—दुसऱ्या कोणालाहि नव्हे. त्या वेळेस तूं जर तिथं असतीस तर तूंच माझ्यापासून ती अंगटी घेऊन त्या वकिलाला देऊन टाकली असतीस."

आपल्या प्रियकराचे ते दुःखी उद्गार ऐकून पोर्शियाला सुख वाटत होतें. त्याची करुण मुद्रा पाहून तिच्या मनाला गुदगुल्या होत होत्या. पण तिनें आविर्भाव ठेवला होता संतापाचा! तिनें नाटक तर फक्कड रंगविलें होतें.

दोन नव्या दांपत्यामध्यें संसाराच्या नांदीच्या वेळींच, कलहाचे असे भैरव सूर, आपल्यामुळे निघूं लागले आहेत, हें पाहून उदारधी ॲन्टोनिओला वाईट वाटलें. तो एकच वाक्य बोलला, "या सर्व भांडणास कारण मीच अभागी!"

त्या वाक्याचा पोर्शियाच्या मनावर विजेसारखा परिणाम झाला. ती स्तब्ध उभी राहिली. ते पाहून ॲन्टोनिओ मोजक्या शब्दात आपला निर्धार बोलून दाखवूं लागला,

"हा माझा देह माझ्या मित्रासाठी मी एकदा जामीन ठेवला होता. आताहि बाईसाहेब, मी पुन्हा आपल्याला जामीन रहातो आणि सांगतो, आपला प्रियकर आपला प्रेमभंग कधीहि करणार नाहीं. तो त्याने केला तर आपण माझ्या देहाचे तुकडे तुकडे करा."

आता अधिक ताणणें सुखाचे होणार नाही हे पोर्शियानें ताडले. आपला खेळ पुरा झाला, असे तिच्या मनानें ठरविले. खेळातील पट गुंडाळावा, त्याप्रमाणे तिनें अंगठीचे नाटक आटोपते घेतले आणि झटकन् आपल्या पिशवीतून एक अंगठी काढून अॅन्टोनिओपुढें धरली आणि ती हसत हसत म्हणाली, "महाराज, ही अंगठी तरी जपून ठेवायला सांगा आपल्या मित्राला."

अॅन्टोनिओने ती अंगठी घेऊन बॅसानिओच्या हाती दिली. ती पहाताच बॅसानिओ चमकला. "हीच ती अंगठी! वकिलाला मी दिलेली हीच ती अंगठी!" तो आनंदाने ओरडला. तेव्हा पोर्शियानेहि आनंदाने टाळी पिटली आणि तिने आपल्या साऱ्या प्रेमळ कारस्थानाचा गोड उलगडा केला. तेव्हा तर तेथें आनंदीआनंद कोंदून गेला.

शॉयलॉकच्या सुरीपासून अॅन्टोनिओ बचावला, हे एक आनंदाचे वृत्त. अंगठीचें अभ्र निवळले, हे दुसरे आनंदाचे वृत्त. तसेच तिसरे आनंदाचे वृत्त पोर्शियाने अॅन्टोनिओच्या कानी घातले, ते म्हणजे त्याची तीन जहाजे व्हेनिसला सुखरूप परत आली आहेत.

अॅन्टोनिओचे ग्रहण पूर्णपणे सुटले. त्याच्या मुद्रेवर हास्य झळकूं लागले.

आणि तसेच हास्य जेसिका व लॉरेंझो याच्या चेहऱ्यावर विलसू लागले. कारण शॉयलॉकची अर्धी संपत्ती त्या दोघाना मिळण्याचा जो करार झाला होता तो नेरिसाने त्याना दाखविला. "भुकेलेल्या माणसापुढं पंचपक्वान्नाचं ताटच तुम्ही दोघी स्त्रियानी वाढून ठेवले आहे," लॉरेंझो म्हणाला.

सूर्य उदयाचलावर आला. त्याची तेजस्वी किरणे सर्वत्र पसरलीं आणि त्या तेजामध्यें ती तीन नवदापत्यें न्हाऊन निघाली.



